भारताचे पहिले राष्ट्रपती स्व० डॉ. राजेंद्रप्रसाद यांनी भारताच्या सांस्कृतिक व राजकीय ऐक्यावर दिलेल्या 28 निवडक भाषणांचा हा संग्रह आहे. भारताचा अखंड इतिहास हजारो वर्षांचा असून भारताचे सांस्कृतिक ऐक्य हा आपला सर्वांचा सामाईक वारसा आहे. फुटीर प्रवृत्तीपासून दूर राहण्याचा व आपल्या राष्ट्रीय ऐक्याचे जतन करून ते मजबूत करण्याच्या आवश्यकतेवर त्यांनी भर दिला आहे.

# अनुक्रमणिका

## आपली सामूहिक जाणीव

भारतातील परिस्थितीचा परिचय नसलेल्या एखाद्या परकीयाने आपल्या देशाच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत प्रवास केला तर त्याला येथे इतकी विविधता आढळून येईल की भारत हे एकच राष्ट्र नसून अनेक राष्ट्रांचा समुच्चय आहे व प्रत्येक राष्ट्र दुसऱ्या राष्ट्रापासून वेगळे आहे असे त्याला स्वाभाविकपणे वाटेल. केवळ एखाद्या उपखंडात जी प्राकृतिक विविधता पहावयास मिळते ती त्याला येथे आढळून येईल. उत्तरेला त्याला हिमालयाची हिमाच्छादित शिखरे आढळतील. त्याच्या दक्षिणेकडे त्याला गंगा, यमुना व ब्रह्मपुत्रा यांचे सखल मैदान पहावयास मिळेल. त्याच्या दक्षिणेस, विंध्य, अरवली, सातपुडा, सह्याद्री व नीलगिरी या पर्वतामधील पठाराचा प्रदेश आढळून येईल. त्याने पश्चिमेकडून पूर्वेकडे प्रवास केल्यास त्याला अशीच विविधता आढळून येईल. त्याला येथें सर्व प्रकारचे हवामान आढळेल. हिमालयातील अत्यंत थंड हवामानापासून तो सखल प्रदेशातील अत्यंत कडक उन्हाळ्यापर्यंत, आसाममधील वर्षाला 500 इंच पाऊस पडत असलेल्या भागापासून तो वर्षाला 4 इंच सुद्धा पाऊस जेथे पडत नाही अशा राजस्थानमधील जयसलमीर भागापर्यंत, हवामानाचे सर्व प्रकार त्याला येथे आढळून येतील. असे कोणतेही अन्न-पीक नाही की जे भारतात पिकवता येणार नाही तसेच असे कोणतेही फळ नाही की ज्याची लागवड या देशात होऊ शकत नाही. असे कोणतेही खनिज द्रव्य नाही किंवा प्राणी अथवा वनस्पती नाही की जी या देशात आढळत नाही

शरीराची ठेवण, बुद्धिमत्ता, राहणीचे मान, व आहार यांच्यावर हवामानाचा काय परिणाम झाला आहे हे निरनिराळ्या भागातील लोकांचा अभ्यास केल्यानंतर समजू शकेल. या देशात कित्येक मापाचे लोक राहात आहेत आणि बोलींची संख्या तर फारच मोठी आहे. त्याचप्रमाणे सर्व धर्मांचे लोक येथे राहात असून बोलीप्रमाणेच त्यांच्याही संप्रदायाची संख्या पुष्कळ मोठी आहे. ही विविधता पाहिल्यानंतर, भारत हे एक राष्ट्र नसून अनेक देशांचा समुच्चय आहे असे कोणत्याही परकी व्यक्तीला स्वाभाविकपणे वाटेल कारण जी व्यक्ती खोलवर विचार करीत नाही तिला फक्त विविधताच आढळून येईल परंतु काळजीपूर्वक अभ्यास केल्यास असे दिसून येईल की ज्याप्रमाणे रेशमी दोरा रत्नांना एकत्र आणतो व त्यांचे रूपांतर सुंदर रत्नहारात होते आणि रत्नहाराचे प्रत्येक रत्न सुंदर असतेच परंतु त्याचबरोबर ते इतर रत्नांच्या सौंदर्यातही भर घालत असते त्याचप्रमाणे या विविधतेच्या मुळाशी सर्वांना एकत्र आणणारा ऐक्यभाव आहे ही केवळ कविकल्पना नाही तर हे एक सत्य आहे गेल्या हजारो वर्षांपासून अस्तित्वात असलेल्या अनेक सांस्कृतिक प्रवाहांचा संगम होऊन आता एकाच

---

दिल्लीमध्ये, 15 मार्च, 1951 रोजी अ० भा० सांस्कृतिक परिषदेच्या उद्घाटनप्रसंगी केलेले भाषण.

भारतीय संस्कृतीचा प्रवाह या देशात वाहतो आहे. हा प्रवाह यापुढेही असाच वाहत राहो व ज्या प्रवृत्तींनी काळाशी टक्कर दिली त्या प्रवृत्ती अमर होवोत अशी आपली इच्छा आहे व असा आपला प्रयत्न आहे.

आपल्या देशात अनादिकालापासून जो नैतिक प्रवाह वाहात आला आहे तो कधी कधी मूर्त रूप धारण करतो. या नैतिक श्रद्धेचे मूर्त स्वरूप असलेला एक थोर पुरुष आपल्यांत होऊन गेला हे आपले महद्भाग्य. या महापुरुषाने आपल्या निर्जीव शरीरात चैतन्य ओतले, आपल्या मृतप्राय अंत:करणात धैर्य आणि उल्हास निर्माण केला, सत्य व अहिंसा या अमर तत्त्वांसाठी त्याने आपले संपूर्ण जीवन वेचले. हे तत्त्व केवळ भारताच्याच नव्हे तर संपूर्ण मानवजातीच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे.

आपण आपल्या देशात लोकशाही स्वरूपाचे सरकार यापूर्वीच स्थापन केले आहे त्यात व्यक्तीच्या तसेच सामाजिक गटाच्या विकासाला पूर्ण वाव आहे. व्यक्ती व समाज यांच्यात सामान्यपणे एक प्रकारचा विरोध असतो. व्यक्तीला आपली स्वत:ची उन्नती व विकास साधावयाचा असतो व असे करताना दुसऱ्या एखाद्या व्यक्तीच्या प्रगतीच्या मार्गात अडथळा निर्माण झाला तर जोपर्यंत दोन्ही व्यक्ती अहिंसात्मक मार्गाचा अवलंब करीत नाहीत तो-पर्यन्त त्यांच्यांत संघर्ष निर्माण झाल्यावाचून राहाणार नाही.

आपली संस्कृती, अहिंसेच्या तत्त्वज्ञानात रुजलेली आहे. या तत्त्वाला आपण अतिशय महत्त्व देतो स्वत:चा बडेजाव वाढविणे हा हिंसेचा एक प्रकार आहे. त्याग हे अहिंसेचे दुसरे नाव आहे आपल्या तत्त्वज्ञानाप्रमाणे, त्यागातून आत्म-संतोषसुद्धा प्राप्त होऊ शकतो आपल्या लोकांनी त्यागात अत्युच्च कोटीचा आनंद व आत्मज्ञान अनुभविले आहे. श्रुतीत म्हटले आहे, "ईश्वराने तुम्हाला जे दिले असेल त्याचा तुम्ही उपभोग घ्या." या तत्त्वानुसार आपल्याला व्यक्ती-व्यक्तीमधला, व्यक्ती व गट यांच्यामधला, जमातीजमातीमधला व राष्ट्राराष्ट्रा-मधला संघर्ष मिटवायचा आहे आपल्या सामूहिक नैतिक जाणीवेच्या मुळाशी हेच तत्त्व आहे या श्रद्धेमुळेच आपण निरनिराळ्या विचारप्रवाहांना, धर्मांना, व संप्रदायांना पूर्ण वाव देतो, त्यांची भरभराट होऊ देतो. निरनिराळ्या भाषांना त्यांचा विकास करण्याची पूर्ण मोकळीक देतो

आपण निरनिराळ्या वंशाच्या लोकांना व त्यांच्या संस्कृतीला आत्मसात केले व आपल्या संस्कृतीचा इतर लोकांच्या संस्कृतीशी संगम होऊ दिला. आपला इतर देशांशी जो संबंध जोडला गेला तो आक्रमणामुळे नव्हे तर प्रेमामुळे जोडला गेला. इतर लोकांना आपले अंकित बनविण्यासाठी आपण आपल्या सामर्थ्याचा कधीही उपयोग केला नाही. आपण त्यांना जिंकले असेल तर ते त्यांची अंत:करणे जिंकून. म्हणून बऱ्याच बाबतीत आपल्याला स्वत:ला या नैतिक जाणीवेचे विस्मरण झाले असले तरी या जाणीवेचा इतर देशांवर जो प्रभाव पडला होता त्याचे अवशेष संपूर्ण जगभर आपल्याला अजूनही पहावयास मिळतात.

ही नैतिक जाणीव आजच्या युगात आपल्याला कशा प्रकारे उपयुक्त ठरू शकेल हा आजचा सर्वात महत्त्वाचा प्रश्न आहे. या बाबतीत देशात दोन विचार-प्रवाह आहेत हे कोणालाही अमान्य करता येणार नाही. काही लोकांना असे वाटते की जी नैतिक जाणीव माणसाला सत्य, अहिंसा व त्याग यांचे धडे शिकविते तिला आजच्या आधुनिक औद्योगिक युगात काही किंमत नाही. आजच्या स्पर्धेच्या अर्थव्यवस्थेत कसल्याही नीतीतत्त्वाचा विचार न करता स्वत:चा बडेजाव वाढविणे अत्यावश्यक आहे. औद्योगिक युगातील या आक्रमक अहंमन्यतेचा व आपल्या नीतीव्यवस्थेत अंगभूत असलेल्या विनय व सौजन्य या तत्त्वाचा, काळजी-पूर्वक तौलनिक अभ्यास केला पाहिजे व आपल्या देशाच्या पुनर्रचनेच्या कार्यामागील प्रेरक शक्ती म्हणून या दोहोंमधील एकाचा स्वीकार केला पाहिजे.

या आक्रमक अहंमन्यतेचा अपरिहार्य परिणाम म्हणून पाश्चात्य देशात एकीकडे वर्गसंघर्षाचा सिद्धांत व दुसरीकडे निर्घृण राजकीय व आर्थिक पिळवणूक या गोष्टी उदयाला आल्या. बळी तो कान पिळी, केवळ याच न्यायाने सांस्कृतिक प्रगती होऊ शकेल की अनेक शतकांपूर्वी आपल्या ऋषीमुनींनी ज्या नैतिक जागृतीकडे आपल्या लोकांचे लक्ष वेधले तिच्या आधारे सुद्धा सांस्कृतिक प्रगती करून घेता येईल याबाबत आपल्याला निर्णय करायचा आहे. आपली इच्छा असली तरी सुद्धा वैज्ञानिक क्षेत्रात पाश्चात्य देशांनी केलेल्या प्रगतीपासून आपण स्वत:ला अलिप्त ठेवू शकत नाही. तसेच औद्योगिक क्षेत्रात ते जी प्रगती करीत आहेत, तिच्यापासून आपण दूर राहू शकत नाही. असा प्रयत्न करणे ना इष्ट आहे ना आवश्यक आहे. विज्ञान व आपली संस्कृती यांचा मेळ आपल्याला कसा घालता येईल या एकाच गोष्टीचा आपल्याला विचार करावयाचा आहे. या प्रश्नाचा विचार करताना आपण एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे ती अशी की आपल्या देशावर वेळोवेळी अनेक नैसर्गिक व मानव-निर्मित आपत्ती येऊन कोसळल्या तरीसुद्धा आपल्या लोकांची सहनशीलता नष्ट झाली नाही किंवा कमी झाली नाही साम्राज्ये उदयाला आली व नष्ट पावली. निरनिराळ्या धर्मांचा उत्कर्ष झाला व ते र्‍हास पावले आपल्यावर परकीयांची अनेक वेळा आक्रमणे झाली निसर्ग व मानव यांनी आपल्यावर संकटाच्या राशी ओतल्या. तरीसुद्धा आपल्याला आपले अस्तित्व टिकवता आले, व आपल्या संस्कृतीचे, आपल्या सहनशीलतेचे जतन करता आले अत्यंत विपन्नावस्थेत सुद्धा आपण असे विचारवंत पुरुष व शूरवीर निर्माण केले आहेत की ज्यांना जगाच्या इतिहासाच्या कोणत्याही युगात हक्काने अत्युच्च स्थान प्राप्त झाले असते आपल्या राजकीय गुलामगिरीच्या काळात, आपण गांधीजींसारखा क्रांतिकारी ध्येयांनी प्रेरित झालेला, श्रद्धायुक्त अंत:करणाचा युगपुरुष; रवींद्रनाथ टागोरांसारखे प्रतिभावंत कवी व श्री अरविंद आणि रमण महर्षी यांच्यासारखे योगी निर्माण केले. संपूर्ण जग आजही ज्यांचा गौरव करीत आहे, असे विद्वान व शास्त्रज्ञही याच काळात आपण निर्माण केले.

ज्या परिस्थितीसमोर टिकाव न लागून जगातील काही विख्यात संस्कृती नष्ट पावल्या अशा परिस्थितीतही आपण आपले अस्तित्व टिकवू शकलो इतकेच नव्हे तर आपल्याला आपल्या नैतिक व बौद्धिक वैभवाचेही जतन करता आले. आपल्या सामूहिक जाणीवेला पर्वत, महासागर व आकाश याच्यापेक्षाही अधिक दृढ, खोल व व्यापक असलेल्या नैतिक पायाचे अधिष्ठान आहे हे आपले अस्तित्व टिकून राहण्याचे मुख्य कारण आहे असे मला वाटते. जी राष्ट्रे नष्ट झाली आहेत त्यांची सामूहिक जाणीव, वंशाभिमान व भाषाभिमान याच्या पिंजऱ्यात बंदिस्त होती. हा पिंजरा कदाचित सोन्याचा असेल परंतु तो पिंजराच होता व त्यामुळे त्याची शक्ती क्षीण झाली. याचा परिणाम असा झाला की जेव्हा हा पिंजरा मोडला किंवा तो बदलावा लागला तेव्हा राष्ट्रीय जाणीव निराधार झाली इतकेच नव्हे तर ती चैतन्यहीन झाली. परंतु आपली सामूहिक जाणीव किंवा हेच दुसऱ्या शब्दांत सांगायचे म्हणजे आपली संस्कृती, वंश, प्रदेश किंवा भाषा यांनी कधीही सीमित नव्हती. आपल्या जीवनाची ही विविध अंगे म्हणजे ते व्यक्त करण्याचे केवळ निरनिराळे मार्ग आहेत व आपल्या जीवनाला बंदिस्त करणारी किंवा त्याची गळचेपी करणारी बंधने असे त्यांचे स्वरूप कधीही राहिले नाही हे मी यापूर्वीच सांगितले आहे. आपल्या संस्कृतीचे वस्त्र मानवतेच्या धाग्यांनी विणलेले आहे. जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात आपल्याला तिचा प्रसार करता आला नाही हे खरे आहे. परंतु तिचे अस्तित्व नाकारता येणार नाही व तिला आपण योग्य ते महत्त्व दिले पाहिजे. आणखी एक मुद्दा आपण लक्षात ठेवला पाहिजे व तो म्हणजे ही संस्कृती हा आपल्या राष्ट्राचा प्राण आहे असे आपण समजले पाहिजे. सर्व खेड्यांना व शहरांना, निरनिराळ्या प्रदेशांना व धर्मांना आणि निरनिराळ्या जातीच्या लोकांना एकमेकांशी जोडणारी जर कोणती एक गोष्ट असेल तर ती म्हणजे ही संस्कृती. आपल्या लोकांमध्ये अन्य सर्व बाबतीत भिन्नता असेल परंतु त्यांना सर्वांना एकत्र जोडणारे हेच बंधन आहे गांधीजींना याच सत्याची जाणीव झाल्यामुळे आपल्या बुद्धिवादी वर्गाच्या नेतृत्वाने भारतीय जनतेला क्रांतिप्रवण करण्यासाठी त्यांनी या नैतिक जाणीवेचा आधार घेतला. अहिंसा, सेवा व त्याग ही तत्त्वे अनेक शतकांपासून सुप्तावस्थेत असल्यामुळे या तत्त्वांचा उद्घोष करून गांधीजींनी आवाहन करताच जनमानस एकाएकी जागृत व कार्यप्रवण झाले. सामान्य माणसाच्या अंत:करणात निर्माण झालेली ही जाणीव ही क्रांतीमागील मुख्य प्रेरक शक्ती करण्यात गांधीजींचा दूरदर्शीपणा आहे; यातच त्यांचे यश आहे समाजातील काही लोकांची माथी जातीयवादाने भडकलेली होती. अशा वेळी सुद्धा नैतिक जाणीवेला आवाहन करून, बापूजींना बिहारमधील व दिल्लीमधील लोकांना आटोक्यात ठेवता आले

आजच्या गतिशील युगाला अनुरूप ठरण्यासाठी या नैतिक जाणीवेत काही बदल करणे आवश्यक आहे का याचा विचार तुम्हाला करायचा आहे परंतु मला असे वाटते की ती आधुनिक युगाच्या गरजांना अनुरूप अशीच आहे

आधुनिक औद्योगिक संस्कृती, प्रदेश, वंश किंवा भाषा यांनी सीमित करता येत नाही. कारण या सर्व गोष्टी निश्चयाने विकासात अडथळे निर्माण करतात. वैश्विक अधिष्ठानावरच ती टिकू शकते. समाजाची वंशवार, भाषावार विभागणी कायम राखली पाहिजे असा आग्रह, पाश्चात्य लोकांचा आहे. माझ्या मते, पाश्चात्य देशांमधील संघर्षाचे मुख्य कारण हेच आहे. म्हणून आपल्या संस्कृतीने या परिसीमांना कधीही फारसे महत्त्व दिले नाही हे सत्य या संदर्भात फार महत्त्वाचे ठरते. म्हणून मला असे वाटते की आधुनिक युगात ज्यामुळे संघर्ष निर्माण होतो ते अन्याय व अत्याचार पुन:पुन्हा होऊ नयेत असे वाटत असेल तर आपल्या अर्थव्यवस्थेची उभारणी या नैतिक पार्श्वभूमीवर करणे, व वैयक्तिक नफा किंवा सुख याऐवजी स्वार्थत्याग व समाजकल्याण ही आपल्या अर्थव्यवस्थेची मुख्य प्रेरक शक्ती करणे आवश्यक आहे.

आज सांस्कृतिक सुसंवादाच्या प्रश्नाखेरीज निरनिराळ्या प्रादेशिक भाषांमधील वाङ्मय लोकांना कसे उपलब्ध करून देता येईल याही प्रश्नाचा विचार आपल्याला करावयाचा आहे प्रत्येक प्रादेशिक भाषेच्या साहित्यविषयक संस्थांनी आपापल्या भाषांचे साहित्य देवनागरी लिपीत छापणे इष्ट नाही काय ? उत्तर भारतातील भाषांचा परस्परांशी जवळचा संबंध असल्यामुळे देवनागरी लिपीत छापल्या जाणाऱ्या साहित्यकृतींचा रसास्वाद निदान या भागातील जवळजवळ सर्व लोकांना घेता येईल असे मला वाटते.

त्याचप्रमाणे, अनुवाद करून, साहित्यविषयक देवाणघेवाण करणारी एखादी अकादमी स्थापन करणेही इष्ट ठरेल. ही अकादमी, देशातील साहित्यिकांना प्रेरणा देईल व चांगल्या दर्जाचे साहित्य व टीकात्मक वाङ्मय निर्माण करायला हातभार लावील. साहित्य, संगीत, नृत्य, चित्रकला, वास्तुकला व शिल्पकला ही सर्व संस्कृतीचीच अंगे आहेत. या अंगांद्वारे भारत आपले राष्ट्रीय ऐक्य व्यक्त करीत आला आहे हे ऐक्य तुम्ही आणखी दृढ कराल अशी मला आशा वाटते

## बंधुभाव व जातीय सलोखा

आपल्यासमोर अनेक प्रश्न आहेत परंतु त्यातील काही मूलभूत आहेत. जातीय सलोखा हा असाच एक प्रश्न आहे आपल्या देशात अनेक धर्म व संप्रदाय आहेत. दुर्दैवाने या ना त्या कारणाने, जातीय तेढ निर्माण होते. तटेबखेडे क्वचित झाले तर त्यात काही विशेष नाही कारण भाऊ-भाऊ, नवरा-बायको, व बाप-लेक यांचो सुद्धा भांडणे होतात. ही भांडणे लवकर मिटविली जातात व त्यांच्यातील जिव्हाळ्याच्या संबंधावर त्यांचा काही परिणाम होत नाही. त्याचप्रमाणे, एखाद्या जमातीला काही कारणास्तव दुसऱ्या एखाद्या जमातीशी भांडावेसे वाटले तरी त्यामुळे त्यांच्यात सतत तेढ असता कामा नये. व त्यांनी

---

एर्नाकुलम येथे 29 मार्च 1951 रोजी केलेल्या जाहीर सभेतील भाषणातून.

दीर्घकाल मनात कडवटपणा ठेवता कामा नये. सुदैवाने तुमच्या प्रदेशाची परंपरा, सहिष्णुतेची आहे व मला असे सांगण्यात आले आहे की येथे हिंदु, मुसलमान, ख्रिश्चन व ज्यू हे सर्व लोक कित्येक शतके गुण्यागोविंदाने राहात आले आहेत. एखादे वेळी येणाऱ्या माझ्यासारख्या व्यक्तीला सुद्धा रस्त्यांतून जाताना चर्च, हिंदूंची देवळे व सिनेगॉग (ज्यू लोकांची मंदिरे) ही सर्व जवळजवळ असल्याचे आढळते. सर्व धर्मांविषयी सहिष्णुता व आदर वाटत असल्यामुळेच ही गोष्ट शक्य झाली.

खऱ्या धर्माचा संबंध दैवी शक्तीच्या अस्तित्वावर श्रद्धा ठेवण्याशी आहे अशी माझी श्रद्धा आहे व सर्व धर्मांच्या खऱ्याखुऱ्या अनुयायांनाही असेच वाटते. ही दैवी शक्ती, सर्वशक्तिमान असून, सर्व प्राणिमात्र या शक्तीची जणू काही लेकरे आहेत त्यामुळे सर्व मानवांनी परस्परांशी बंधुभावाने वागले पाहिजे. सर्व धर्मांची हीच शिकवण असेल तर परमेश्वराची पूजा करण्याच्या आपल्या पद्धती विभिन्न असल्या तरी त्याचा परिणाम आपल्या बंधुभावावर होण्याचे काही कारण नाही. भारतात आपल्या पूर्वजांना, प्राचीन ऋषी-मुनींना या गोष्टीची जाणीव झाली व सत्य एकच असले तरी शहाणे लोक विभिन्न मार्गांनी त्याचा ठाव घेतात असा त्रिकालाबाधित सिद्धांत त्यांनी मांडला. हे सत्य आपण केवळ बौद्धिक दृष्ट्या ग्रहण करून चालणार नाही तर आपल्या दैनंदिन व्यवहारातही हे सत्य आपल्याला आचरणात आणावयाचे आहे. या सत्याचे आकलन झाल्याखेरीज आपल्याला काहीही साध्य करता येणार नाही. एकमेकाला दडपून टाकण्यात ज्या शक्तीचा अपव्यय होतो तिचा आपल्या सर्वांच्या समृद्धीसाठी उपयोग करता येईल. आपला देश ज्या मूलभूत प्रश्नाचा अनादिकालापासून विचार करीत आहे त्यातील हा एक प्रश्न आहे. आज आपण परकीयांच्या गुलामगिरीतून मुक्त झालो आहोत व आपले भवितव्य आपल्या हाती आहे. परंतु हा प्रश्न अत्यंत निकडीचा आहे यावर आजही पुन्हा भर देण्याची आवश्यकता आहे

आपल्या सर्वांचा ज्याच्याशी स्वाभाविक संबंध आहे असा दुसरा मूलभूत प्रश्न म्हणजे आपली अर्थव्यवस्था. आपल्या देशाची लोकसंख्या पुष्कळ मोठी आहे देशातील काही लोक अत्यंत गरीब आहेत ज्याच्याजवळ पुरेसे अन्नवस्त्र नाही किंवा निवाऱ्याची जागा नाही अशा लोकांची संख्या कोटींनी मोजता येईल. त्याचबरोबर आपल्यातील काही लोक अत्यंत सधन आहेत जे सपन्न आहेत त्यांना खाली ओढायची आपली इच्छा नाही तर जे विपन्नावस्थेत आहेत त्यांची उन्नती करून त्यांना संपन्न करायची आपली इच्छा आहे. खालच्याला वर नेण्याऐवजी वरच्याला खाली ओढणारे तत्त्वज्ञान मी समजू शकत नाही. जर काही आवश्यक असेल तर ते म्हणजे राहणीचे मान वाढविणे. एखादा गरीब माणूस जेव्हा त्याचा शेजारी सुखी व सपन्न असल्याचे पाहतो तेव्हा त्याच्या मनात कधी-कधी असूया निर्माण होते ही स्वाभाविक प्रवृत्ती आहे व ती आपण सहन केली पाहिजे. परंतु जो सुखी व संपन्न आहे त्याला खाली ओढण्याचा प्रयत्न न करता

दोघानीही उन्नती करण्याचा प्रयत्न केला तर ते सुखी होतील असे आपण त्यांना सांगायला हवे.

गांधीजींनी अहिंसेवर भर दिला. केवळ अहिंसेवरच सुव्यवस्थित समाजाची उभारणी होऊ शकते. आपल्याला हिंसेने हिंसेला दडपून टाकता येईल अशी आशा बाळगून हिंसा करणे निरर्थक आहे. उत्तरेत एक म्हण आहे तिचा अर्थ असा की चिखलाने चिखल धुवून काढता येत नाही, चिखल धुवून काढण्यासाठी स्वच्छ पाणी हवे. हिंसेचे उच्चाटन करण्यासाठी हिंसेपेक्षा पुष्कळ अधिक चांगले असे काही तरी हवे. त्यासाठी अहिंसा आवश्यक आहे व हीच गांधीजींची शिकवण आहे. अनेक धर्म व अनेक भाषा असलेल्या भारतासारख्या देशात अहिंसा हे आपल्या दैनंदिन जीवनाचे अधिष्ठान नसेल तर आपली भांडणे किंवा प्रश्न कधीच सुटणार नाहीत ही गोष्ट त्यांनी ओळखली. हे केवळ आपल्याच बाबतीत नव्हे तर संपूर्ण जगाच्या बाबतीतही खरे आहे. भारत हे जगाचे लहानसे रूप आहे. म्हणून परस्परांशी किंवा इतर देशांशी वागताना आपण अहिंसेचा अवलंब केला पाहिजे असे मी आग्रहाने सांगत आलो आहे. कधी कधी अशी परिस्थिती निर्माण होते की जेव्हा आपल्याला आपल्या मताविरुद्ध कृती करावी लागते. अशी अपवादात्मक उदाहरणे आपण समजू शकतो व ती आपण क्षम्य मानू शकतो. परंतु जर जाणूनबुजून आपण आपल्या मार्गापासून दूर गेलो तर ते अनिष्ट ठरेल. अहिंसेचा अवलंब करून आपण आपले जीवन घडविण्याची आवश्यकता आहे. ज्याप्रमाणे रात्रीनंतर दिवस येतो त्याचप्रमाणे आज आपल्यासमोर ज्या अडचणी आहेत, त्या उद्या नाहीशा झाल्यावाचून राहणार नाहीत. हे सत्य आपण ओळखले तर असा कोणताही प्रश्न राहणार नाही की जो आपल्याला सोडविता येणार नाही. म्हणून गांधीजींनी आपल्याला जे सांगितले त्याकडे आपण नीट लक्ष दिले पाहिजे. आपण त्यांच्या नावाचा केवळ गजर केल्याने कार्यभाग होणार नाही; तर त्यांनी आपल्याला जो मार्ग दाखविला आहे त्या मार्गाने आपण गेले पाहिजे. गांधीजींच्या पावलावर पाऊल टाकूनच आपण आपली उन्नती करून घेऊ शकू असे मला तुम्हाला सांगावयाचे आहे. एकदा ही गोष्ट केली की बाकीच्या सर्व गोष्टी सोप्या होतील

## तामीळ भाषा व संस्कृती

तुम्हाला तुमच्या भाषेचा व संस्कृतीचा जो अभिमान वाटतो तो योग्यच आहे. तुम्ही जेथे जेथे गेला तेथे तेथे तुम्ही तो राखला आहे. तेव्हा संपूर्ण देशाच्या संस्कृतीत भर घालण्याचा तुम्ही विचार करावा हे योग्यच आहे. देशाच्या निरनिराळ्या भागातील विचारप्रवाह मिळून भारतीय संस्कृती झाली आहे. हजारो वर्षांच्या कालखंडानंतर, या विविधतेतही सर्वांना परस्परांशी जोडणारा ऐक्यभाव व एकच संस्कृती आपण निर्माण करू शकलो. ही एक गोष्ट अशी आहे की जिचे

मद्रासमध्ये, 7 एप्रिल, 1951 रोजी तिरुवल्लुर संशोधन संस्थेच्या उद्घाटनप्रसंगी केलेले भाषण

आपण नेहमी जतन करू. आपल्या देशात किंवा देशाबाहेर कोणावरही कोणतीही गोष्ट लादायचा कधीही प्रयत्न करण्यात आला नव्हता. भारतातील लोकांनी दुसऱ्या कोणत्याही देशावर आक्रमण केल्याचे उदाहरण इतिहासात सापडणार नाही. आपल्या देशात प्रत्येक गटाला व भागाला, त्याच्या इच्छेनुसार त्याचा विकास करण्याचे पूर्ण स्वातंत्र्य देण्यात आले. याचा परिणाम असा झाला की अत्यंत समृद्ध वाङ्मय निर्माण करणाऱ्या संपन्न भाषांचा आपल्या देशात उदय झाला.

आज आपण आपल्या देशाची पुनर्रचना करीत आहोत. अशा वेळी तुम्ही या कार्यात पूर्णपणे सहभागी झाले पाहिजे. आपल्या सर्व भाषांचा जास्तीत जास्त विकास होणे आवश्यक आहे कारण त्यावाचून आपल्यासमोर आपण ज्या भारताचे चित्र उभे केले आहे तो भारत आपल्याला निर्माण करता येणार नाही. त्याचबरोबर आपल्याला अशी एक भाषा हवी की जिच्या साहाय्याने आपण उत्तरेपासून दक्षिणेपर्यंत, व पश्चिमेकडून पूर्वेपर्यंत, परस्परांशी व्यवहार करू शकू. गतकाळात या कामासाठी संस्कृतचा उपयोग करण्यात आला केवळ याच कार्यासाठी आपल्याला कोणत्या तरी एका भाषेची गरज आहे. या भाषेचा उपयोग केल्यामुळे आपल्यात विभिन्नता असूनही आपण सर्व एक आहोत असे वाटेल.

तामीळ भाषा व साहित्य यांचा विकास करताना, देशातील सर्व विचारवंतांचा पाठिंबा तुम्हाला राहील याबद्दल मला शंका वाटत नाही तुम्ही आम्हाला राजकीय व सामाजिक कार्यकर्ते आणि प्रशासक देत आहात त्याचप्रमाणे तुम्ही आम्हाला असे साहित्यिक द्यावेत की जे, केवळ तामीळ बोलणाऱ्या व जाणणाऱ्या लोकांनाच नव्हे तर ही भाषा न समजणाऱ्या लोकांनाही स्फूर्ती देऊ शकतील तामीळ भाषेतील साहित्याचा अनुवाद करून ही गोष्ट साध्य करता येईल. अर्थात हे काम मोठे आहे. सरकारी तसेच बिनसरकारी संघटना समन्वयाने हे कार्य करीत आहेत ही आनंदाची गोष्ट आहे

आजकाल, एखाद्या मोठ्या साहित्यकृतीविषयी संशोधन-कार्य करताना, लेखकाचे जन्मस्थान, त्याच्या ग्रंथातील वाक्यरचना व त्याने व्याकरणाचे नियम कितपत पाळले आहेत, यासारख्या गोष्टींना जास्त प्राधान्य दिले जाते. याचा परिणाम असा होतो की लेखकाच्या साहित्यापेक्षा त्याच्याकडेच अधिक लक्ष पुरविले जाते. मानव नव्हे तर त्याने केलेले कार्य हे अधिक महत्त्वाचे आहे. कुरळसारख्या थोर साहित्यकृतींमधील शिकवणींचा प्रसार करण्याला संशोधकांनी हातभार लावला पाहिजे असे मला वाटते त्याच्या निरनिराळ्या आवृत्त्या, विद्वान लोक प्रकाशित करतील अशी माझी खात्री आहे आपल्या पूर्वजांच थोर लोकांनी केव्हा व कोठे कार्य केले हे आपल्याला तारीखवार माहीत नसते परंतु तरी सुद्धा त्यांचे जीवन आपल्या देशातील लक्षावधी लोकांच्या जीवनाचा एक भाग झाला आहे. कुरळच्या लेखकाविषयी फारशी माहिती नसली तरी अनेक शतकांपासून हा ग्रंथ आपल्या जीवनाचा एक भाग झाला आहे

कुरल प्रकाशनाचे कार्य यशस्वी होवो अशी इच्छा व या कार्याला सर्वांकडून प्रोत्साहन मिळो अशी आशा मी व्यक्त करतो.

## भाषेचा प्रश्न

आज तुम्ही माझा जो सत्कार केला आहे त्याबद्दल मी तुमचा आभारी आहे. आपल्या भाषांपैकी एक भाषा हे शिक्षणाचे माध्यम करणारे हे पहिले विद्यापीठ आहे. इतकेच नव्हे तर सर्व शास्त्रीय व इतर विषयावरील क्रमिक पुस्तके या भाषेतून तयार करवून घेऊन ती प्रकाशित करणारे हे आद्य विद्यापीठ आहे व त्यामुळे त्याने केलेला हा सत्कार मला नेहमीच अत्यंत मोलाचा वाटेल. या विद्यापीठाने आपल्यापरीने केलेले कार्य, त्याने माध्यमासाठी निवडलेल्या भाषेच्या मर्यादा लक्षात घेता मला अत्यंत उत्साहजनक वाटले. कारण जेव्हापासून मी सार्वजनिक कार्यात लक्ष घालू लागलो तेव्हापासून या प्रश्नाविषयी मला फार आस्था वाटत आली आहे या विषयासंबंधी लोकमत आज पूर्णतया जागृत झाले आहे व शैक्षणिक प्रयत्नाच्या बाबतीत अपव्यय होऊ नये म्हणून शिक्षण प्रादेशिक भाषातूनच द्यायला हवे ही गोष्ट आज सर्वसामान्यपणे बुद्धिवादी वर्गाला व शिक्षणतज्ञाना मान्य आहे हे सागताना मला आनंद होतो. परंतु तरीसुद्धा काही लोकाच्या मनात, भाषाविषयक धोरणाच्या बाबतीत संदिग्धता आहे त्यासंबंधी तुमच्या परवानगीने मी चार शब्द सागतो.

भारतातील लोकांनी आपल्या घटना समितीमार्फत मंजूर केलेल्या घटनेप्रमाणे देशात लोकशाही समाजव्यवस्था निर्माण करणे, ज्या समाजव्यवस्थेत प्रत्येक व्यक्तीला अथवा गटाला तिचा अथवा त्याचा पूर्ण विकास करण्यासाठी जास्तीत जास्त हक्क व संधी मिळतील अशी समाजव्यवस्था निर्माण करणे हे आपले कर्तव्य आहे हे देशातील प्रत्येकाला माहीत आहे—किंवा ते माहीत व्हावे – असे मला वाटते. तसेच राज्य सरकार व केन्द्र सरकार याच्या धोरणाला आकार देणार्‍या प्रत्येक व्यक्तीला घटनेप्रमाणे समान संधी मिळेल. शिक्षणाच्या माध्यमाविषयीचे धोरण ठरविताना आपण आपल्या कर्तव्याची जाणीव बाळगली पाहिजे. शिक्षण हीच मुळी एक प्रभावी शक्ती आहे व त्याच्यावाचून कोणतीही व्यक्ती तिच्या देशाच्या किंवा प्रदेशाच्या सरकारच्या धोरणावर आपला प्रभाव पाडू शकणार नाही हे मी सागण्याची गरज नाही म्हणून शिक्षणाची साधने अशी असावीत की जी व्यक्ती-व्यक्तीमध्ये किंवा गटागटात भेदभाव करणार नाहीत.

शिक्षण मग ते प्राथमिक, माध्यमिक अथवा उच्च असो, ते प्रत्येक भाषिक गटाला त्याच्या भाषेतून मिळाले पाहिजे. असे झाले तरच कोणत्याही गटाला, शिक्षणाचा लाभ संपादन करण्यावर इतर कोणत्याही गटापेक्षा जास्त पैसा, वेळ किंवा

हैदराबाद येथे 30 ऑगस्ट, 1951 रोजी उस्मानिया विद्यापीठाच्या खास पदवीदान समारंभाच्या वेळी केलेले भाषण.

शक्ती खर्च करावी लागणार नाही. याचाच अर्थ असा की कोणत्याही अवस्थेतील शिक्षण त्या त्या भागाच्या भाषेतूनच द्यायला हवे.

परंतु तो भाषिक गट बराच मोठा असला व ते लोक एका मलग भागामध्ये राहात असले तरच ही गोष्ट शक्य आहे. परप्रांतात अत्यंत अल्पसंख्येने असलेल्या किंवा इतस्ततः विखुरलेल्या लोकांनीही अशी मागणी करणे वाजवी ठरणार नाही. ही मागणी मान्य करण्यात आली तर तिचे काय परिणाम होतील याची सहज कल्पना करता येईल. भारतातील प्रत्येक भाषिक भागात इतर भाषा बोलणारे लोक कमी संख्येने आढळतात. या सर्व लोकांच्या मुलाना, त्यांच्या मातृभाषेतून शिक्षण देण्याची सोय प्रत्येक शाळेत, कॉलेजात व विद्यापीठात करायची झाली तर त्यासाठी प्रचंड खर्च येईल. त्या भागातील परभाषिक लोकांनी तेथील लोकांपासून अलिप्त राहण्यापेक्षा त्यांच्याशी एकरूप होणे हे राजकीय दृष्टीने सुद्धा इष्ट ठरेल. हे लोक त्या भागातील बहुसंख्य लोकांपासून अलिप्त राहिले तर कदाचित गैरसमज व वैमनस्य निर्माण होण्याचा संभव राहील. प्रत्येक भाषिक गटाने हे आर्थिक व राजकीय सत्य विचारात घेतले असते तर भाषेच्या प्रश्नावरून निर्माण झालेल्या गुंतागुंतीच्या परिस्थितीचे पुष्कळ निवारण झाले असते.

प्रत्येक प्रादेशिक भाषा पुरातन तसेच आधुनिक ज्ञानार्जनाचे व ज्ञानसंग्रहाचे उत्तम साधन ठरावे यासाठी तिचा विकास करण्यात आला पाहिजे व तिचे साहित्य संपन्न करण्यात आले पाहिजे. त्याच्या विकासाला प्रोत्साहन देणे हे सर्व राज्य सरकाराचे कर्तव्य आहे. इतर भाषांमधून जे शब्द सहज घेता येण्यासारखे आहेत ते घेऊन हे कार्य करता येईल. भाषेचे शुद्ध स्वरूप कायम राखण्यासाठी तिला परकीय असलेले वाक्प्रचार, शब्द किंवा वाक्यप्रयोग घेतले नाहीत तर ती भाषा संपन्न न होता उलट दरिद्रीच होईल. आपल्या देशातून दारिद्र्य व अज्ञान यांचे उच्चाटन करण्यासाठी आपली सर्व शक्ती आपल्याला राखून ठेवायची आहे व यासारख्या अपायकारक नाही तरी सर्वस्वी अनावश्यक कार्यावर आपण आपली शक्ती खर्च करू शकत नाही. भाषाशुद्धीवाद मला समर्थनीय वाटत नाही. कारण भाषा हे कितीही झाले तरी व्यवहाराचे एक साधन आहे व एखादा शब्द लोकांना चटकन व चांगल्या प्रकारे समजत असेल तर केवळ तो परकीय आहे एवढ्याच कारणास्तव तो का टाकून द्यावा हे मला समजत नाही. बहुजन समाजाला अधिकाधिक प्रमाणात समजेल अशा प्रकारे भाषेचा विकास झाला पाहिजे. तिचा शब्दसंग्रह, शैली व विषय लोकांच्या जीवनाला व त्यांच्या दैनंदिन व्यवहारातील भाषेला जवळचे असले पाहिजेत. समाजातील इतर सर्व संस्थाप्रमाणे भाषासुद्धा लोकांच्या अंतःकरणापर्यंत पोचली तर तिचा पुष्कळ फायदा होईल असे मला वाटते.

प्रादेशिक भाषांचा विकास करून त्या संपन्न करण्याच्या प्रश्नाबरोबरच आणखी एका प्रश्नाचा काळजीपूर्वक विचार करणे आवश्यक आहे. आपल्या

.शात पुष्कळ भाषा बोलल्या जातात. तेव्हा राज्याराज्यांमधील व्यवहारासाठी व अखिल भारतीय स्वरूपाच्या कामासाठी एक सामाईक भाषा असणे आवश्यक आहे. ही भाषा देवनागरी लिपीतील हिंदी असावी व केंद्र सरकारच्या कामकाजात, भारतीय अंक, आंतरराष्ट्रीय स्वरूपात वापरण्यात यावे, अशी तरतूद पूर्ण विचारांती घटना समितीने, आपल्या घटनेत केली. सर्व हितसंबंधी लोकांचे दृष्टिकोन मागावून घेण्याचा प्रयत्न केल्यानंतर करण्यात आलेला हा एकमुखी निर्णय होता. या निर्णयाचा आपल्या किंवा आपल्या गटाच्या हितसंबंधांवर अनिष्ट परिणाम होईल अशी भीती कोणालाही वाटायचे काय कारण असावे हे मी समजू शकत नाही. प्रत्येक भाषिक भागातील शिक्षण-व्यवस्थेत, केंद्र सरकारची भाषा शिकविण्याची सोय करायला हवी यापेक्षा अधिक जास्त मी सांगण्याची गरज नाही. असे केल्याने, अहिंदी भाषी लोकांना कोणत्याही बाबतीत अडचण भासणार नाही. अहिंदी भाषी भागात शिक्षण-व्यवस्थेच्या कोणत्या अवस्थेत हिंदी शिकविण्यात यावी व ती कशा प्रकारे शिकविण्यात यावी हे विलंब न लावता ठरवावे लागेल व जो कार्यक्रम ठरविण्यात येईल तो अमलात आणण्याचे उपाय योजावे लागतील. असे केले म्हणजे घटनेत नमूद केलेला कालावधी संपण्यापूर्वी केंद्र सरकारच्या कामकाजासाठी इंग्रजी-वाचून आपले अडणार नाही

या राज्यात तीन भाषा बोलणारे लोक आहेत. उर्दूचा विकास करण्याचा तें अत्यंत कसोशीने प्रयत्न करीत आहे. उर्दूची वेगळी लिपी व शब्दसंग्रह असला तरी घटनेने केंद्र सरकारची भाषा म्हणून जी भाषा मान्य केली आहे तिचे हे एक वेगळे स्वरूप आहे असे मी समजतो आपल्या देशाला जे प्रश्न सोडवावयाचे आहेत तेच या राज्यालाही सोडवायचे आहेत. परंतु तीन प्रादेशिक भाषांपासून सर्वस्वी भिन्न असलेल्या भाषेचा सरकारी कामासाठी उपयोग करून या राज्याने प्रगती केली आहे. त्याला मिळालेल्या अनुभवाचा लाभ आपण करून घेऊ या. राष्ट्र उभारणीच्या कार्यात हा अनुभव अत्यंत बहुमोल ठरेल असे मला वाटते. आपल्या देशाला गौरवास्पद व हितावह ठरेल असे कार्य करणे या विद्यापीठाचे कर्तव्य आहे.

## भारतीय जीवनात संगीताचे स्थान

भारतीय संगीत ही आपल्याला सर्वांना अभिमान वाटावा अशी गोष्ट आहे. अनेक शतकांपासून संगीत आणि गाणे हे आपल्या राष्ट्रीय जीवनाचे अभिन्न भाग झाले आहेत आपल्या पारतंत्र्याच्या काळात त्याला सरकारी आश्रय मिळाला नाही व ते शिकण्याच्या सोयी नव्हत्या तेव्हा सुद्धा आपल्याला संगीत प्रेरणा देत होते. केवळ इंद्रियाला सुखविणारे करमणुकीचे एक साधन म्हणून नव्हे तर आपल्याला

4 एप्रिल 1952 रोजी नवी दिल्लीमध्ये, भारतीय कला केंद्राने योजिलेल्या संगीत महोत्सवाच्या उद्घाटनाच्या भाषणातील उतारा.

शांती व समाधान देणारे एक साधन म्हणून आपण संगीताकडे पाहिले हे कदाचित त्याचे कारण असेल. संगीत आणि इतर लोकांचे दैनंदिन जीवन यांचे संबंध मला माहीत नाहीत परंतु आपल्या देशाविषयी मी असे म्हणू शकतो की जन्मापासून मृत्यूपर्यंत संगीताची व आपली सारखी सोबत आहे. आपल्या मुलांना डोळे उघडल्याबरोबरच संगीताची पहिली ओळख होते. आपले सर्व संस्कार, विधी, सण आणि उत्सव यांना मंजुळ संगीताची साथ असते. शेतात काम करणारे शेतकरी, मजूर, चरखा चालविणाऱ्या किंवा तांदूळ कांडणाऱ्या आणि गट्ट पाखडणाऱ्या बायका नहमी गाणी गुणगुणताना अथवा मिळून गाताना आढळतात. गाण्याचा आस्वाद घेण्यासाठी परमेश्वराने आपले कान अधिक संवेदनाशील केले आहेत की काय असे मला कधीकधी वाटते भारतीय जीवनात संगीत ओतप्रोत भरले आहे ही गोष्ट स्पष्ट आहे. भारतीयांना संगीत केवळ क्षणिक सुख देत नाही तर प्रगाढ व चिरकाल टिकणारे मानसिक समाधान देते. संगीताच्या स्वरमिलाफात सर्व वाद आणि संघर्ष काही काळ विरून जातात. संगीत ही आत्म्याची भाषा आहे, आणि मानवतेचा आवाज आहे त्याला स्थलकालाच्या किंवा वंश-धर्माच्या मर्यादा नाहीत. ते कालातीत आहे ते मानवी जीवनातील सर्वात मोठी प्रेरक शक्ती ठरू शकते. मीरा आणि चैतन्य हे संगीतवेडे होते याचे बहुधा हेच कारण असावे कबीर, सूरदास, तुलसीदास, तुकाराम आणि नरसी मेहता यांच्यासारख्या संतांची आणि सत्पुरुषांची कवने आपल्या जीवनाचा अविभाज्य भाग झाली आहेत. कवित्वाने परिपूर्ण असे राधा-कृष्णाचे वाङ्मयसुद्धा आपल्याला अखेरीस परमेश्वराप्रत नेते या वैशिष्ट्यामुळे आपले संगीत देशातील सर्व लोकांना परस्परांशी निगडित करू शकले निदान एक गोष्ट स्पष्ट आहे की जीवनाच्या इतर क्षेत्रांत मतभेद व हेवेदावे असले तरी भारतीय संगीताच्या क्षेत्रात सर्व भागांतील लोकांची विचारसरणी सारखी राहिली आहे आजही ती सारखी आहे व यापुढेही ती सारखी राहील. सर्व प्रकारच्या राजकीय मतभेदावर, विरोधावर व धर्मांधतेवर या ऐक्याने मात केली असून, प्रादेशिकता किंवा भाषावाद यांचा तिच्यावर अनिष्ट परिणाम झाला नाही.

भारतीय संगीताच्या नि:संशय दोन पद्धती आहेत. परंतु त्या मूलत: परस्परविरोधी नाहीत. वस्तुत संगीताच्या या दोन पद्धतींत पुष्कळ साधर्म्य असून त्यांचे स्वरूप एकजिनसी असल्याचे आढळून येईल संगीताच्या या दोन्ही पद्धती राग व स्वर यांच्या एकाच तत्त्वावर आधारलेल्या आहेत यावरून ही गोष्ट स्पष्ट होईल. या दोन पद्धतीमधील फरक हा केवळ वरपांगी आहे. त्यामुळे कोणाच्याही मनात भ्रम निर्माण होण्याचे कारण नाही भारतीय संगीताला त्याचे वैशिष्ट्यपूर्ण स्वरूप प्राप्त झाले आहे ते याच तत्त्वामुळे

ज्याप्रमाणे गतकाळात आपल्या साधुसंतांनी प्रेमाचा व शांततेचा संदेश घरोघर पोहोचविला त्याचप्रमाणे आजचे आपले गायक घरोघर व खेड्यापाड्यात भक्तिभावपूर्ण संगीताचा प्रसार करतील असे मला आशा वाटते. मानवी कल्याणाचा हा मार्ग अनुसरून, जीवनाच्या त्यांच्या आकांक्षा व ध्येय सफल होवो.

# कर्नाटकाचे कार्य

भारतीय संस्कृती निःसंशय एकच आहे. परंतु तिचे स्वरुप संमिश्र आहे. भारतातील प्रत्येक विभागाने आपापल्या वैशिष्ट्याची भर घालून ती बनविली आहे. भारतीय संस्कृतीत कर्नाटकाने जी भर घातली आहे तिचा तुम्हाला सार्थ अभिमान वाटणता येईल.

भारतीय संस्कृतीच्या महत्वाच्या लक्षणांविषयी चार शब्द सांगायची माझी इच्छा आहे. त्यापैकी एक लक्षण म्हणजे भारतीय संस्कृतीचे सुसंवादित्व. ते वरवरचे नसून त्याची मुळे खोलवर गेलेली आहेत. एखाद्याने आपल्या देशातील निरनिराळ्या विभागांना भेट दिली तर विभिन्नतेतही आढळणारी एकता त्याच्या दृष्टोत्पत्तीस येईल. भारतीय संस्कृतीला वैशिष्ट्य प्राप्त करून देणारे हे सुसंवादित्व आहे. म्हणूनच उत्तरेकडील एखाद्या मनुष्याला दक्षिणेकडील कलांमध्ये साधर्म्य आढळले किंवा दक्षिणेकडील एखाद्या मनुष्याला दक्षिणेतील व उत्तरेकडील मंदिरांची बांधणी किंवा रचना एकसारखी दिसून आली तर त्यात आश्चर्य वाटायचे काही कारण नाही.

एकतेचा आत्मा विशेषेकरून गायन, नृत्य, व वास्तुकला यासारख्या ललित-कलांमध्ये व्यक्त झाला आहे. वास्तुकलेविषयी शिशिरकुमार मित्रा यांनी म्हटले आहे की वास्तुकला ही सर्व कलांची जननी असेल तर या गोष्टीची प्रचीती इतर देशांपेक्षा भारतात विशेषेकरून येते. भारतीय देवळे व लेणी आणि मूर्तीकलेचे व चित्रकलेचे त्यांच्यातील सुंदर नमूने, हे प्राचीन भारतातील वास्तुशास्त्रज्ञांच्या कलात्मकतेचे मूर्तिमंत उदाहरण आहे.

तुमची कानडी भाषा ही भारताच्या प्रादेशिक भाषांपैकी व अत्यंत जुन्या भाषांपैकी एक भाषा आहे. 2000 वर्षांपासून ती प्रचारात असून तिचे वाङ्मय अत्यंत संपन्न आहे. कानडी लोकांनी संस्कृत वाङ्मयातही अत्यंत मोलाची भर घातलेली आहे.

अकराव्या आणि बाराव्या शतकात भारतीय कला व विद्या यांचे जे पुनरुज्जीवन झाले त्याचा प्रारंभ दक्षिण भारतात झाल्याबद्दल दक्षिण भारताला विशेषतः कर्नाटकाला रास्त अभिमान वाटेल. काही काळानंतर या पुनरुज्जीवनाचे रुपांतर भक्तीसंप्रदायात झाले. भारताच्या मध्ययुगीन इतिहासातली ही अत्यंत महत्वाची घटना आहे. कर्नाटकात जन्मलेले मध्वाचार्य व तेथे आश्रय घेतलेले रामानुजाचार्य हे या संप्रदायाचे दोन आधारस्तंभ होत. या पुनरुज्जीवनाचा प्रसार उत्तर भारतात सर्वत्र झाला त्याचा एक महत्वाचा परिणाम म्हणजे धार्मिक भावनेची मोठी लाट उसळून भक्तिपर कवनातून ती व्यक्त झाली. काही शतके बाल्यावस्थेत असलेल्या हिंदीला याचा खूप फायदा झाला. आज सुद्धा हिंदी

---

15 एप्रिल 1954 रोजी नवी दिल्लीमध्ये कन्नड सांस्कृतिक महोत्सवाच्या उद्घाटनाच्या भाषणातील उतारा.

वाङ्मयात, भक्तीयुगातील साहित्य अत्यंत बहुमोल आहे. म्हणून एका दृष्टीने आपण असे म्हणू शकतो की हिंदी साहित्याला संपन्न करणारी परिस्थिती निर्माण करण्यासाठी दक्षिण भारताने बराच हातभार लावलेला आहे. बंगाली आणि मराठी या भाषांना देखील या पुनरुज्जीवनाचा अतिशय फायदा झाला आहे. निरनिराळ्या प्रदेशाच्या कला व साहित्य आणि तेथील भाषा यांच्यात एकरूपत्व व सुसंवादित्व निर्माण होणे अपरिहार्य होते.

भौगोलिक आणि ऐतिहासिक कारणांमुळे अठराव्या आणि एकोणिसाव्या शतकात कानडी मागे पडली परंतु ती आता पुन्हा प्रगतीपथावर वाटचाल करू लागली आहे याबद्दल मला आनंद वाटतो. कानडी माध्यमातून शिक्षण देणारी दोन विद्यापीठे आणि अनेक शैक्षणिक संस्था आता तुम्हाला लाभल्या आहेत. कानडी भाषेला, प्रभावी वर्तमानपत्रे आणि कादंबऱ्या, कविता आणि नाटके यांनी समृद्ध असे वाङ्मय लाभले आहे. स्वातंत्र्याच्या चळवळीत कानडी लेखकांनी महत्त्वाची कामगिरी केली हे पाहून मला फार आनंद होतो.

तुम्ही साध्य केलेल्या कार्याचे कर्नाटकाच्या बाहेर सर्वत्र फार कौतुक केले जाते, हे सांगायची फारशी गरज नाही. संपूर्ण देश कर्नाटक संगीताचा आस्वाद घेत आहे आणि त्याला मान देत आहे. ज्या भागात कानडी समजत नाही तेथे सुद्धा लोक हे संगीत ऐकतात आणि त्यात रस घेतात.

कानडी सांस्कृतिक महोत्सव साजरा करण्याचे ठरविल्याबद्दल मी त्याच्या नियोजकांचे अभिनंदन करतो. अशा प्रकारच्या उत्सवांमुळे उच्च दर्जाची करमणूक होते शिवाय त्यांना राष्ट्रीय महत्त्वही आहे. त्यांच्यामुळे इतर भाषा बोलणाऱ्यांना त्या त्या प्रादेशिक भाषेचा आणि कलेचा परिचय होण्याची संधी मिळते. दिल्लीमध्ये दक्षिण भारताचे सांस्कृतिक उत्सव साजरे करण्याच्या कल्पनेचे मी स्वागत करतो. अशा प्रकारचे कार्यक्रम देशाच्या इतर भागातही होतील अशी मला आशा वाटते. प्रत्येक राज्याजवळ किंवा प्रदेशाजवळ इतरांना देण्यासारखे काही तरी आहे असे मला वाटते. असे महोत्सव हे सांस्कृतिक क्षेत्रात देवाणघेवाण करण्याचे योग्य साधन आहे.

## पंजाबी संस्कृती

राजधानीतील पंजाबी बोलणाऱ्या नागरिकांनी हा मेळावा भरविण्याचे ठरविले याचा मला आनंद वाटतो. इतर प्रादेशिक भाषा बोलणाऱ्यांचेही सांस्कृतिक आणि साहित्यिक मेळावे येथे अलिकडेच भरले होते. दिल्लीमध्ये पंजाबी बोलणाऱ्यांची संख्या इतर कोणतीही भाषा बोलणाऱ्या लोकांच्या संख्येपेक्षा बहुधा कमी नसावी. या शहरातील पंजाबी लोकांनी आपला असा मेळावा न भरविणे हे खरोखरच विचित्र दिसले असते. जेव्हा श्री. गुरुमुखसिंग मुसाफिर

नवी दिल्लीमध्ये 6 नोव्हेंबर, 1954 रोजी पंजाबी सांस्कृतिक मेळाव्याच्या उद्घाटन प्रसंगी केलेले भाषण.

ाच्याकडून आणि इतर मित्रांकडून मला या कार्यक्रमाची माहिती मिळाली ाव्हा मी आनंदाने उद्घाटनाचे आमंत्रण स्वीकारले.

भारत हा अनेक भाषा बोलणाऱ्यांचा देश आहे. त्यापैकी बऱ्याच भाषा संपन्न ाणि समृद्ध आहेत. त्या भाषांचे स्वतःचे वाङ्मय आणि वाङ्मयीन परंपरा आहेत. भाषेच्या आणि रीतीरिवाजाच्या विविधतेमुळे भारत हा अनेक सांस्कृतिक गट असलेला देश आहे असे आपण म्हणतो. भारताच्या संस्कृतीची उभारणी या सर्व प्रादेशिक संस्कृती आणि त्यांच्या परंपरा यांच्यापासूनच झाली आहे. याचा अर्थ असा नाही की भारतीय संस्कृतीला तिचे वेगळे पृथकत्व नसून ती अनेक प्रादेशिक संस्कृतींची केवळ गठडी आहे. वस्तुस्थिती अशी आहे की अनेक शतकांत एकमेकांशी आलेले संबंध आणि केलेली देवाणघेवाण यातूनच ही बहुरंगी संस्कृती निर्माण झाली आहे. तिचे स्वतःचे असे विशिष्ट सौंदर्य आहे. निरनिराळ्या प्रदेशांचे रीतीरिवाज आणि परंपरा हे पूर्वीप्रमाणे भारतीय संस्कृतीचे अविभाज्य भाग असले तरी संपूर्ण भारतीय संस्कृतीविषयी असे म्हणता येईल की तिच्या पृथकत्वामुळे तिचे स्थान प्रत्येक प्रादेशिक संस्कृतीच्या वर आहे.

अनेक भाषा असणे ही गोष्ट हितावह नाही असे काही लोक समजतात, हे मला माहीत आहे. अनेक भाषांमुळे गतकाळात केंद्रपराङ्मुख प्रवृत्ती कदाचित निर्माण झाल्या असतील तसेच देशाच्या ऐक्यावर या बाबीचा अनिष्ट परिणाम होतो असेही काही लोकांना वाटले असेल. परंतु ते सर्व आता बदलले आहे. बदललेल्या परिस्थितीचा आढावा आता आपण घेतला पाहिजे. सुदैवाने या बाबतीत आपण फार पुढे गेलो आहोत आणि राजकीय स्वातंत्र्य आणि राष्ट्रीय ऐक्य या कल्पनांना एक वेगळा अर्थ लाभला आहे. भारतीय ऐक्याचा आजचा पाया इतका भक्कम आहे की पूर्वी ज्या प्रवृत्तींमुळे तो ढासळण्याची भीती वाटत असावी त्याच प्रवृत्ती तो अधिक पक्का करणारे दुवे आज निर्माण करू शकतात. भारतीय संघराज्यातले सर्व लहानमोठे घटक आज संपूर्ण सांस्कृतिक आणि भाषिक स्वातंत्र्य उपभोगीत आहेत आणि प्रत्येक प्रादेशिक भाषेची आणि संस्कृतीची प्रगती हा भारतीय संस्कृतीचा बहुमोल ठेवा आहे असे आपण समजतो. भारतीय संघराज्याच्या निरनिराळ्या घटक राज्यांना घटनेनुसार दिलेले हे स्वातंत्र्य ही आपल्या यशस्वितेची केवळ हमी नव्हे तर कसोटी आहे असे मला वाटते.

मी आता पंजाबी भाषेबद्दल चार शब्द सांगतो. इतर आर्य भाषांप्रमाणेच पंजाबीसुद्धा मध्ययुगात आकार घेऊ लागली आणि तिच्या इतर भाषा-भगिनीप्रमाणेच तिचेही पोषण महान साधुसंतांच्या वाणीने केले. या भाषेला तिचे स्वतःचे वैशिष्ट्य आणि सौंदर्य आहे. आधुनिक पंजाबी वाङ्मयाचा गेल्या 100 वर्षांतच प्रामुख्याने विकास झाला असला तरी जी पंजाबी महाकाव्ये त्यांच्या वाङ्मयीन गुणवत्तेमुळे अत्यंत बहुमोल ठरली आहेत ती काही शतकांपूर्वी लिहिली गेली. या महाकाव्यांत दिसून येणारी काव्यपरंपरा व पंजाबी लोकगीते

प्राचीन आहत. ही परंपरा जिवंत ठेवणे आणि तिच्यात शक्य तितकी भर घालणे हे आपले कर्तव्य आहे. अशा सांस्कृतिक महोत्सवामुळे आपली सांस्कृतिक परंपरा जिवंत ठेवायला हातभार लागतो. म्हणून ते भरविण्याच्या कल्पनेचे मी स्वागत करतो. केवळ पंजाबी बोलणाऱ्या लोकांचीच नव्हे तर राजधानीतील इतर भाषिकांची सुद्धा या मेळाव्यामुळे करमणूक होईल, अशी माझी खात्री आहे अशा मेळाव्यांना करमणुकीखेरीज शैक्षणिक महत्त्वही आहे. अशा बहुरंगी लोकसंख्या असलेल्या शहरात अशा कार्यक्रमामुळे सहकार्याची वृत्ती अंगी बाणविण्याची व देवाणघेवाण करण्याची उत्कृष्ट संधी मिळते. मी तुमच्या या मेळाव्याला यश चिंतितो आणि असे प्रसंग आपल्या शहरी आणि ग्रामीण जीवनात नेहमी येतील, अशी आशा व्यक्त करतो.

## केरळची कला-परंपरा

आज मल्यालम कलामहोत्सवाचे उद्‌घाटन करताना आणि तो पाहताना मला फार संतोष होत आहे. इतरही सांस्कृतिक मेळावे पाहण्याचा आणि त्यांना किती महत्त्व आहे व देशाच्या सांस्कृतिक जीवनावर, विशेषत. भारतीय ऐक्यावर त्याचा काय परिणाम होतो याविषयी चार शब्द सांगण्याचा योग मला अनेक वेळा आला आहे.

केरळीय मित्रांकडून जेव्हा मला या महोत्सवाचे उद्‌घाटन करण्याचे आमंत्रण मिळाले तेव्हा परस्परांच्या संपर्कामुळे आणि एकच विचार व दृष्टिकोन यांच्यामळे गेल्या अनेक शतकांपासून निर्माण होत असलेल्या ऐक्य-रज्जूचे, विविध प्रादेशिक संस्कृतींचे किती मनोहारी व नयनरम्य वस्त्र विणले गेले आहे हा विचार मनात येऊन मला आश्चर्य वाटल्यावाचून राहिले नाही. निरनिराळ्या प्रादेशिक संस्कृती आणि परंपरा यामुळे भारतीय एकतेचे स्वरूप बहुरंगी झाले आहे. भारतीय संस्कृती विविध संपन्न प्रादेशिक संस्कृतींनी प्रभावित झाल्याचे दिसून येईल व तरीसुद्धा संपूर्ण भारतीय संस्कृतीची कल्पना इतकी सुस्पष्ट व अपूर्व आहे की कोणत्याही एका प्रादेशिक संस्कृतीला तिच्या समान लेखता येणार नाही किंवा प्रादेशिक संस्कृतीला भारतीय संस्कृती समजता येणार नाही.

या प्रश्नाचा थोडा विचार केला तर आपल्याला असा निष्कर्ष काढावाच लागेल की जरी आपला देश विस्तृत आणि विविधतापूर्ण असला तरी कालाच्या ओघात काही विचारांचा संपूर्ण देशभर इतका प्रसार झाला की मोठी अंतरे आणि हवामान, भाषा व चालीरीती यांच्यातील भिन्नता जवळजवळ असून नसल्यासारखीच होती उत्तरेकडे हिमालयाच्या बर्फाळ प्रदेशातील दंतकथा व पौराणिक कथा आणि दक्षिणेकडील अति दूरच्या केरळ प्रदेशातील दंतकथा व पौराणिक कथा यांचा विषय एकच आहे. विस्ताराने पहा-

दिल्लीमध्ये 9 डिसेंबर, 1954 रोजी मल्यालम कलामहोत्सवाचे उद्‌घाटन करताना केलेले भाषण.

मचे झाले तर रामायण आणि महाभारत या दोन महाकाव्यांनी निरनिराळ्या प्रदेशांतील विचारप्रवाह, वाङ्मय व सामाजिक रीतीभाती यांच्यातील दुवा साधला आहे असे मला वाटते. सर्व भारतीय भाषांच्या, विशेषत: उत्तर, पूर्व, व पश्चिम या भागांतील भाषांच्या वाङ्मय निर्मितीला, या दोन महाकाव्यांच्या किंवा त्यांच्या भागाच्या स्थानिक भाषातील अनुवादाने प्रारंभ झाला, ही केवळ एक आकस्मिक घटना म्हणता येणार नाही. द्राविडी भाषांत सुद्धा अभिजात वाङ्मयाची परंपरा स्थानिक भाषांतून रामायण आणि महाभारत यांचा अनुवाद करून ती लोकप्रिय करण्यानेच सुरू झाली. आपल्या सर्व भाषांमध्ये या दोन महाकाव्यांची भाषांतरे किंवा त्यातील विषयांवर आधारलेले स्वतंत्र ग्रंथ यांनी त्या त्या भाषामधील साहित्यनिर्मितीला प्रारंभ झाला आहे हा एक महत्त्वाचा मुद्दा आहे त्यामुळे निरनिराळ्या प्रदेशाचे वाङ्मय आणि कला यांनी मिळून तयार झालेल्या या भारतीय संस्कृतीच्या विविधतेला जोडणारा एकतेचा धागा कोणत्याही चिकित्सकाला जर आढळला तर त्यात आश्चर्य वाटण्यासारखे काहीही नाही.

केरळ प्रदेशाला त्याचे स्वतःचे रीतीरिवाज आणि कलात्मक व वाङ्मयीन परंपरा आहेत. त्याच्या भाषेचे काव्य, नाटक, आणि कादंबऱ्या यांनी युक्त असे संपन्न वाङ्मय आहे. महाकाव्यांतील गोष्टींवर आधारलेले नृत्यनाट्य हा केरळचा एक महान सांस्कृतिक ठेवा आहे असे मला सांगण्यात आले आहे. नट आणि नटी यांची वेषभूषा, त्यांची कलात्मकता, आणि जिवंतपणा यामुळे हे नृत्यनाट्य अत्यंत लोकप्रिय झाले आहे. कलाजगतात ज्यामुळे केरळ सुप्रसिद्ध झाले त्या कथाकलीविषयी जास्त काही सांगण्याची गरज नाही. भारतीय नृत्य-प्रकारांत कथाकली हे एक सर्वांत उत्तम प्रकारचे नृत्य आहे हे सर्व रसिकांनी मान्य केले आहे. त्याचप्रमाणे केरळमधील लोकांनी संगीत, चित्रकला आणि वास्तुकला इत्यादी क्षेत्रांतहि नावलौकिक मिळविला आहे

बहुरंगी स्वरूपाच्या या दिल्ली शहरात दूरदूरच्या प्रदेशाची माहिती देणारे असे सांस्कृतिक महोत्सव साजरे करण्याच्या कल्पनेचे मी स्वागत करतो देशाच्या उत्तर भागातील लोकांना अगदी दक्षिणेकडील भाषाच्या कलेचे व सांस्कृतिक परंपरेची शक्य तितकी जास्त माहिती असणे इष्टच नव्हे तर आवश्यक आहे

उत्तरेकडील लोकांनीसुद्धा असे मेळाव दक्षिणी प्रदेशात भरवावेत अशी माझी इच्छा आहे आजचा मेळावा ज्यांनी पाहिला त्यांना त्यात पुष्कळ रस वाटेल यात मला शंका वाटत नाही.

मी मल्याळम कला महोत्सवाला यश चिंतितो आणि त्यामुळे इतर लोकांना केरळमधील कला आणि संस्कृती यांची माहिती करून घेण्यास उत्तेजन मिळेल आणि मल्याळी लोकांनासुद्धा आपली संस्कृती अधिक समृद्ध करण्याची संधी मिळेल अशी मला आशा वाटते.

# संस्कृत

मी काही संस्कृतचा विद्वान नाही किंवा माझी जेवढी इच्छा होती तेवढे संस्कृतचे अध्ययन मी केले आहे असाही माझा दावा नाही. मी नम्रपणे एवढेच म्हणू शकतो की माझे त्या भाषेवर फार प्रेम आहे. संस्कृतवरील माझ्या प्रेमाचे विश्लेषण करायचे म्हणजे मला हे कबूल केलेच पाहिजे की हे प्रेम काहीसे तिच्या उदात्ततेमुळे व काहीसे भावनात्मकतेमुळे आहे. भारतीय संस्कृतीचे संपन्न विचार, तिच्या आध्यात्मिक महत्त्वाकांक्षा आणि तिचे भूतकालीन वैभव ज्यात जपून ठेवलेली आहे अशी ही संस्कृत भाषा आहे. पाली आणि प्राकृत, या दोन भाषा ज्ञानसंग्रहाचे कार्य करण्याच्या बाबतीत संस्कृतला पूरक आहेत असे म्हणता येईल. त्या संस्कृतला अगदी जवळच्या आहेत. किंबहुना पाली आणि प्राकृत महत्त्वाच्या आहेत याच कारणास्तव संस्कृतचे अध्ययन आवश्यक आहे. कारण संस्कृतचा अभ्यास केल्याशिवाय या भाषांमधील वाङ्मयाचे रसग्रहण करता येणार नाही. एखाद्याला भारतीय तत्त्वज्ञानाची किंवा भारतीय संगीत आणि नृत्य यासारख्या ललितकलांची उत्क्रांती कशी होत गेली याची माहिती करून घ्यायची असो किंवा आपल्या प्रदीर्घ इतिहासातले तुटलेले दुवे जुळविण्याचा प्रयत्न करायचा असो, त्याने प्रथम संस्कृत भाषेचे ज्ञान मिळविणे जरूर आहे.

माझ्या दृष्टीने संस्कृतच्या अभ्यासाला अतिशय महत्त्व आहे. संस्कृत हे केवळ विचार व कला या क्षेत्रांतील आपल्या भूतकालीन ज्ञानाचे आणि कार्याचे भांडार नाही तर आपल्या राष्ट्राच्या आकांक्षा आणि सांस्कृतिक परंपरा व्यक्त करणारे मुख्य माध्यम आहे. शिवाय आधुनिक भारतीय भाषांना तिच्यापासूनच प्रेरणा मिळत गेली आहे. त्या तिच्यातूनच उद्‌भवल्या आहेत. काटेकोरपणे विचार केल्यास दक्षिणेकडील चार भाषा, आर्य भाषा नसल्या तरी परस्परांच्या संपर्कामुळे आणि सांस्कृतिक व धार्मिक मिलाफामुळे त्यांनी आपले बरेचसे शब्द संस्कृतमधून घेतले आहेत.

संस्कृतने गेली अनेक शतके भारताला एकत्र आणण्याचे काम केले आहे असे मी अनेक वेळा ऐकले आहे. यामध्ये बरेच तथ्य आहे. दोन हजार वर्षांपूर्वी भौगोलिक दृष्ट्या भारत सध्या आहे त्यापेक्षा बहुधा जास्त मोठा होता. अशा परिस्थितीत दूरदूरच्या अंतरावरील प्रदेशात राहणाऱ्या लोकांनी एकमेकांशी कसे संबंध ठेवले असतील याची तुम्ही कल्पना करा.

पुरातन काळी जेव्हा दळणवळणाची आजच्यासारखी साधने नव्हती तेव्हा संपूर्ण देशात जवळजवळ एकाच प्रकारचे शिक्षण, एकच धार्मिक संस्कार आणि एकाच प्रकारचे समज होते. संस्कृत हेच भावना आणि विचार व्यक्त करण्याचे व साहित्य निर्मितीचे साधन होते. निरनिराळ्या प्रदेशात निरनिराळ्या प्रादेशिक भाषा

---

11 नोव्हेंबर, 1955 रोजी संस्कृत विश्व परिषदेच्या वार्षिक अधिवेशनातील अध्यक्षीय भाषणातील उतारा

बोलल्या जात असताना संस्कृत हीच खऱ्या अर्थाने सर्वांची भाषा होती. जिला आपण राष्ट्रीय भाषा म्हणू त्या भाषेचा दर्जा तिने अनेक शतके उपभोगला असे म्हणता येईल. या देशाच्या सांस्कृतिक उत्क्रांतीच्या कार्यात संस्कृतने खरोखर फार मोठी कामगिरी बजावली.

माझ्या बोलण्याचा अर्थ असा नाही की संस्कृत भाषेला पुन्हा तिचे पूर्वीचे स्थान देऊन आपण तिला आंतरराज्य भाषा करावी किंवा करता येईल. काही लोकांनी अशी सूचना केली होती याची मला जाणीव आहे. या सूचनेच्या इष्टानिष्टतेवर किंवा व्यवहार्यतेवर मत व्यक्त करण्याचे धाडस न करता मी असे ठामपणे म्हणू शकतो की आज परिस्थिती पुष्कळ बदलली असली तरी या परिस्थितीतही संस्कृत-जवळ, संपूर्ण देशाला देण्यासारखे पुष्कळ आहे. या थोर भाषेला औपचारिक-रीत्या आपण कोणतेही स्थान दिले तरी आधुनिक भारतीय भाषांचे पालनपोषण तीच करते ही सत्यस्थिती आहे.

एका प्रदेशापासून दुसरा प्रदेश पुष्कळ दूरवर असला आणि चालीरीती व परंपरा यांच्याबाबतीत पुष्कळ भिन्नता आढळून येत असली तरी उत्तरेकडील मनुष्याला, दक्षिणेतील दैनंदिन जीवन, त्याच धार्मिक संस्कारावर व समजांवर अधिष्ठित आहे असे जेव्हा आढळते तेव्हा त्याच्या चित्तवृत्ती उचंबळून आल्यावाचून राहात नाहीत.

## तामीळनाड आणि हिन्दी प्रचार

मला तामीळ येत नाही आणि मी कंबनचा एकही शब्द वाचू शकत नाही, हे माझे दुर्भाग्य होय. परंतु मी लोकांकडून जे काही ऐकले आहे त्यावरून उत्तरेकडे आमच्या भाषेत तुलसीदासाने जे कार्य केले तेच कार्य तुमच्या भाषेत महाकवी कंबनने केले याची मी कल्पना करू शकतो. कंबनचा उल्लेख, 'दक्षिणेतील तुलसी-दास' म्हणून करणे केवळ एवढेच मी करू शकतो कारण मला तुलसीदासाची माहिती आहे आणि कंबनची माहिती नाही. उत्तरेकडील परिस्थितीशी परिचित असणाऱ्या कोणालाही, प्रत्येक खेड्यात लोक तासन् तास तुलसीदासाचे दोहे किती आवडीने म्हणतात हे माहीत आहे. याच पद्धतीने प्राचीन ज्ञान आणि तत्त्वज्ञान समाजाच्या खालच्या थरापर्यंत पोचविले गेले म्हणून ज्या लोकांना संस्कृत येत नाही आणि जे लोक वाल्मीकि-रामायण किंवा भारतीय तत्त्वज्ञानविषयक एखादे ग्रंथ वाचू शकत नाहीत त्या लोकांच्या जीवनावर कंबनच्या काव्याचा केवढा प्रभाव पडला असेल याची कल्पना मी करू शकतो तुलसीदास रामाचा भक्त असला तरी शिवाकडे त्याचा जास्त ओढा होता आणि एका प्रसंगी त्याने म्हटले आहे की मनुष्य शिवभक्त असल्यावाचून तो खरा रामभक्त होऊ शकणार नाही. ते काहीही असो, उत्तरेतील लोकांनी तत्त्वज्ञानविषयक मतभेदांना आणि वादाला गौणत्व

---

14 नोव्हेंबर, 1955 रोजी कंबन दिन महोत्सवात केलेल्या अध्यक्षीय भाष-णातील उतारा.

देऊन शिव आणि राम यांना एकच मानले आहे. तुलसीदासाला ज्या ग्रंथापासून प्रेरणा मिळाली त्यापासून कंबनलाही प्रेरणा मिळाली असली पाहिजे व त्याला केवळ एका आदर्श पुरुषाचे नव्हे तर विष्णूच्या एका अवताराचे जीवन चित्रित करता आले असले पाहिजे, याची कल्पना मी करू शकतो. तुलसीदासाच्या काव्यातील सौंदर्यपेक्षाही त्याची प्रत्येक ओळ ज्या भक्तिरसाने ओथंबलेली आहे त्यानेच सामान्य माणूस अधिक मोहून जातो. तुलसीदासाप्रमाणेच कंबनच्याही बाबतीत त्याच्या काव्यसौंदर्यापेक्षा त्याच्या काव्यातील भक्तिरसाची मोहिनी वाचकाच्या मनावर अधिक पडत असली पाहिजे असे मला वाटते.

आपण अधूनमधून भारताच्या राष्ट्रभाषेसंबंधी चर्चा करतो. येथे तामीळ भाषी लोकांसमोर त्याच्या अत्यंत आवडत्या विषयावर भाषण करताना, हिंदी भाषी व हिंदीच्या प्रचाराशी संबंध असलेली एक व्यक्ती या नात्याने मी असे सांगू इच्छितो की प्रादेशिक भाषांच्याऐवजी हिंदीचा उपयोग करण्याचा विचार ना उत्तरेकडील ना दक्षिणेकडील लोकांच्या मनात आहे व तसे करण्याचा मूर्खपणा कोणी केलाच तर ही गोष्ट करणे अशक्य आहे हे त्याला लौकरच कळून चुकेल. परंतु माझी खात्री आहे की आपण इतके मूर्ख नाही. कोणतीही गोष्ट कोणावरही लादण्याचा विचार आपण कधीही केला नाही. मग प्रत्येकाला अत्यंत प्रिय असलेली जी त्याची भाषा तिच्या बाबतीत अशी सक्ती करण्याची गोष्ट तर दूरच राहिली. म्हणून मी येथे जमलेल्या दक्षिणी लोकांना विनंती करतो की त्यांनी या प्रश्नाकडे शक्य तितक्या व्यावहारिक दृष्टीने पाहावे. भारतामध्ये इतर कोणत्याही भाषेपेक्षा हिंदी बोलणाऱ्या लोकांची संख्या जास्त आहे हा निव्वळ अपघात आहे याच कारणासाठी अखिल भारतीय कार्याकरिता हिंदी भाषा मान्य करण्यात आली आहे. लोकांचे लक्ष त्यांच्या स्वत:च्या भाषेपासून दुसरीकडे वळविणे किंवा त्या भाषा दुर्बळ करणे असा हेतू कधीही नव्हता. म्हणून मी असे सुचवितो की संपूर्ण देशाचे कामकाज करण्याच्या दृष्टिकोनातून एक व्यावहारिक सूचना म्हणून तिचा विचार करण्यात यावा. केवळ घटनेमुळेच नव्हे तर व्यवहार्यतेमुळे येऊन पडणाऱ्या मर्यादांची जाणीव तुम्हाला आहेच. ही मर्यादा अशी की ज्या कार्यासाठी प्रादेशिक भाषांचा उपयोग हिंदीइतक्याच किंवा तिच्यापेक्षाही अधिक चांगल्या रीतीने करता येईल त्या कार्यासाठी नव्हे तर अखिल भारतीय कामकाजासाठी हिंदीचा उपयोग करायला पाहिजे. या कार्यासाठी हिंदीचा स्वीकार करण्याला लोकांचा विरोध असावा याचा विचार करणे आम्हा उत्तरेकडील लोकांना कसे कठिण वाटते हे तुम्ही सहज समजू शकाल. बहुधा तुम्ही असे उलट उत्तर घाल की कुरकुर न करता तिचा स्वीकार आम्हाला कसा करता येईल याची तुम्हाला कल्पना येणे कठिण आहे केवळ संपूर्ण राष्ट्राच्या सोयीसाठी एका भाषेचा स्वीकार करण्यात आला आहे जर देशातील निम्म्यापेक्षा जास्त लोकांना दुसरी एखादी भाषा समजली असती तर त्या भाषेला हा फायदा मिळाला असता आणि ती भाषा नि:संशय अखिल भारताकरिता उपयोगात आणली गेली असती.

हिंदीचा स्वीकार केल्यामुळे इतर भाषिकांचे नुकसान होईल असे सांगण्यात येते. त्यावर मात्र मला असे सांगायचे आहे की हिंदीचा स्वीकार करताना कोणाचीही गैरसोय होणार नाही अशी खबरदारी घ्यावयास पाहिजे. माझ्या माहितीप्रमाणे अशी खबरदारी घेतली जात आहे व प्रवेशाला इतरांशी स्पर्धा करता येण्यासाठी व या सर्वांत भाग घेताना अहिंदी भाषी लोकांची गैरसोय होऊ नये यासाठी यापुढेही सावधगिरीचे उपाय योजले जातील. हे आश्वासन संसदेत देण्यात आले आहे आणि राष्ट्रपती म्हणून आश्वासन देणे हे माझे काम नसले (आश्वासने देणे हे मंत्र्यांचे काम आहे. तेच आश्वासने पूर्ण करू शकतात) तरी अशा बाबतीत थोड्या फार अधिकारवाणीने व मंत्र्यांना काय वाटते हे मला माहित असल्यामुळे, मी न कचरता असे आश्वासन देऊ शकतो की कोणावरही कोणतीही भाषा लादण्याचा सरकारचा विचार नाही. अखिल भारतीय कार्याकरिता हिंदीचा स्वीकार करण्यात आला असला तर तो एवढ्यासाठीच की देशातील बहुसंख्य लोकांच्या दृष्टीने ती सोयीस्कर आहे. भाषेच्या गुणवत्तेचा प्रश्नच येथे उपस्थित होत नाही. बहुतेक भारतीय भाषा प्रगल्भ आहेत असे मला वाटते. परंतु राज्यकारभारासाठी सुमारे 200 वर्षे त्यांचा वापर न झाल्यामुळे देशातील सर्व लोकांना समजण्यासारखा शब्दसंग्रह त्या भाषांत नसू शकेल. एक हिंदी-भाषी व्यक्ती या नात्याने मी सर्व अहिंदी भाषी लोकांना आतापर्यन्त अनेक वेळा अशी विनंती केली आहे की आधुनिक कल्पना व विचार हिंदीला योग्य रीतीने व्यक्त करता यावे या दृष्टीने त्यांनी, त्यांची जशी इच्छा असेल त्याप्रमाणे हिंदी भाषेला आकार देण्याचा व ती घडविण्याच्या कार्यात सहभागी व्हावे. ही भाषा जेव्हा राष्ट्रभाषा किंवा संपूर्ण देशाची भाषा बनेल तेव्हा, ती संपन्न करण्याच्या कार्यातील आपला वाटा उचलणे, हे अन्य भाषिकांचे केवळ भाग्य नव्हे तर कर्तव्यही ठरेल. गतकालातही असेच घडले आहे. भारतातील मुसलमान राजांच्या काळातील फारशी व अरबी भाषांच्या प्रभावामुळे हिंदीतील कोणत्याही पुस्तकात तुम्हाला पुष्कळ फारशी व अरबी शब्द आलेले आढळून येतील. आजच्या हिंदीवर तुम्हाला, बंगाली, मराठी, गुजराती व इंग्रजीचा सुद्धा प्रभाव पडल्याचे आढळून येईल. तामीळचाही काही प्रभाव पडला आहे की नाही हे मला माहीत नाही. परंतु इतर भाषांच्या व हिंदीच्या ज्ञानामुळे मी असे म्हणू शकतो की इतर भाषांकडून जे काही घेता येणे शक्य असेल ते आत्मसात करायला हिंदीचे दरवाजे नेहमीच खुले राहिले आहेत. त्या भाषेला जसे मी माझी भाषा म्हणतो तसेच तुम्हालाही म्हणता यावे म्हणून तिला आकार देण्याच्या कामी तुम्ही हातभार लावावा अशी विनंती मी तुम्हाला करतो.

दक्षिणेतील निदान एक भाषा आपल्याला माहीत झाल्याशिवाय व या भाषेतील काही चांगली पुस्तके वाचल्याशिवाय लोकांच्या भावना, त्यांचा प्रवृत्ती-धर्म व त्यांच्या वृत्ती यांचे ज्ञान होणार नाही, निदान या कारणास्तव तरी उत्तरेतील लोकांनी दक्षिणेतील एखादी भाषा शिकायला पाहिजे असे मी वारंवार सांगत आलो

आहे. म्हणून उत्तर भारतीयांनी दक्षिण भारतीयांच्या भाषा शिकणे आवश्यक आहे. आतापर्यंत संस्कृत हे आपले माध्यम होते. संस्कृतमुळे समन्वय व ऐक्य साधले गेले. अन्य कशानेही ते साध्य झाले नसते. आपला देश अधिक संपन्न व सामर्थ्यवान होण्यासाठी आणि हे ऐक्य व हा समन्वय कायम ठेवण्याकरिता काही तरी करण्याची हीच वेळ आहे.

तुम्हाला अशी विनंती करणे हीच कंबनला मी अर्पण करू शकणारी सर्वोत्तम आदरांजली आहे. ज्याला हिंदीचे तामीळ इतकेच चांगले ज्ञान आहे त्याने कंबनच्या वाङ्मयाचा हिंदीत अनुवाद केला तर उत्तर भारतातील अनेक लोकांना, कंबनच्या केवळ काव्याचा व भक्तिरसाचा नव्हे तर तामीळ भाषेच्या थोरवीचाही परिचय होईल याबद्दल माझी खात्री आहे.

## राष्ट्रीय दृष्टिकोनाची आवश्यकता

संकुचित मनोवृत्तीमुळे आपल्यात कोणत्या गोष्टी निर्माण होऊ शकतात याचे अतिशय अस्वस्थ करणारे दृश्य नुकतेच आपल्या पाहण्यात आले. प्रांतांच्या सीमेमध्ये थोडा फेरबदल होताच, गेल्या काही आठवड्यांत घडली इतकी उलथापालथ होऊ शकते, याची, गांधीजींबरोबर ज्यांनी कार्य केले आहे त्यांना कल्पना सुद्धा आली नसेल. देशाने पाहिलेले संकुचित मनोवृत्तीचे हे शेवटचे दृश्य ठरेल, अशी आपण आशा करू या आपल्यापैकी प्रत्येकाने जीवनाची वाटचाल करताना ऐक्यभाव वाढविला पाहिजे व आपली भाषा, आपला प्रांत हेच सर्वस्व आहे असे समजता कामा नये. केवळ देशच राज्याची जोपासना करू शकेल आणि कोणतेही राज्य, मग ते कितीही सामर्थ्यवान आणि सुसंघटित असले तरी, संपूर्ण देशाचे तुकडे होत असताना ते टिकून राहू शकणार नाही. म्हणून आपण आपले विचार, आपली वाचा आणि आचार याविषयी जागरूक आणि सावध राहिले पाहिजे.

अगदी उत्तरेकडील प्रांतात राहणारा मी भारताच्या अगदी दक्षिणेकडील भागात येऊन बोलत आहे. त्यामुळे मी या संपूर्ण देशाविषयी बोलू शकतो. कन्याकुमारीजवळ राहणाऱ्या तुम्हा लोकांना मी विनंती करतो की हिमालयाच्या पायथ्याचा प्रदेश आपलाच आहे असे तुम्ही समजा आणि हिमालयाच्या पायथ्याशी राहणाऱ्याला म्हणजे मला, कन्याकुमारी माझीच आहे असे समजू द्या. आपण हा ऐक्यभाव व स्वदेशाभिमान अंगी बाणवला नाही व देशहितासाठी, जातपात, सम्प्रदाय, धर्म इत्यादि संकुचित मनोवृत्तींना तुच्छ लेखले नाही तर आपण आपले स्वातंत्र्य गमावून बसू आणि आपली लोकशाही लौकरच नष्ट होईल. नुकत्याच घडलेल्या घटनांमुळे हा आपल्याला इशाराच मिळाला आहे. याचा आपण गंभीरपणे विचार करू या. परिस्थितीला तोंड देण्यासाठी

1 फेब्रुवारी, 1956 रोजी त्रिवेंद्रम महानगरपालिकेने दिलेल्या मानपत्राला उत्तर देताना केलेल्या भाषणातील उतारा.

लोक कटिबद्ध होतील आणि आपल्या देशातील लोकशाहीचा पाया भक्कम आहे असे सिद्ध करतील अशी आशा आपण बाळगू या. अलिकडल्या काही महिन्यांत ज्या दगली घडल्या त्या, समुद्राच्या लाटांवरील फेसासारख्या ठरतील, व त्या फेसाप्रमाणेच हे दूषित वातावरणही लौकरच नष्ट होईल अशी आशा आपण करू या.

आपल्या देशाच्या भूतकालीन थोरवीला शोभेल असा उज्ज्वल भविष्यकाल निर्माण करण्याच्या कार्यातील आपापला वाटा आपण उचलू या.

## पंजाबी भाषा

इतर भारतीय भाषांप्रमाणेच पंजाबी भाषासुद्धा भराभर प्रगती करीत आहे आणि तिचे वाङ्मय संपन्न होत आहे हे पाहून कोणालाही अतिशय संतोष होईल. सर्व भारतीय भाषा एकाच कुटुंबातील घटकांप्रमाणे आहेत. त्या सर्वांचे मिळून जे वाङ्मय ते भारतीय वाङ्मय. यांतील प्रत्येक भाषा महत्त्वाची आहे आणि प्रत्येक भाषा भारतीय वाङ्मयात मोलाची भर घालून त्याला वैभवसंपन्न करते. म्हणून या भाषांमध्ये संघर्ष किंवा विरोध असल्याचा प्रश्नच उद्भवत नाही. प्रत्येक भाषेचे वैशिष्ट्य आहे आणि तिचे वाङ्मय आहे. त्या भाषांचे परस्परांतील बंधन इतके मजबूत आहे की इतर भाषांची वाढ कशी झाली याचा अभ्यास केल्याशिवाय त्यांतील कोणत्याही भाषेची उत्पत्ती आणि वाढ कशी झाली हे समजणे अशक्य आहे.

प्रागैतिहासिक काळापासून भारतीय वाङ्मयाचा प्रवाह सतत वाहात आला आहे व त्यात एकात्मे आणि विचार-स्वातंत्र्याचे ध्येय ठळकपणे मांडले आहे. वैदिक युगानंतर ऐतिहासिक काल सुरू होतो आणि या कालखंडात वाङ्मयीन विकास झाल्याचे दिसून येते. या कालखंडात संस्कृत या एकाच भाषेचा वाङ्मयनिर्मितीचे माध्यम म्हणून उपयोग होत होता. काही काळानंतर पाली आणि प्राकृत या भाषाही वाङ्मयनिर्मितीसाठी उपयोगात येऊ लागल्या आणि संस्कृतबरोबर याही भाषांची वाढ होऊ लागली. मध्ययुगात या तिन्ही भाषांतून इतर भाषा निर्माण होऊ लागल्या आणि याच वेळी आधुनिक भारतीय भाषांना आकार प्राप्त होऊ लागला. या सर्व भाषा इंडो-आर्यन गटातील असून भोवतालच्या परिस्थितीनुसार त्यांच्या विशिष्ट लकबीने त्या वाढू लागल्या पंजाबीसरट या सर्व भाषांचे मूळ एकच आहे ही गोष्ट स्पष्ट आहे त्यांचा शब्दसंग्रह मुख्यत: एकाच मूलस्थानापासून निघालेला आहे आणि भारतीय संस्कृती, विचार आणि ऐतिहासिक पार्श्वभूमि याच्यापासूनच त्या सर्वांना प्रेरणा मिळाली आहे. दक्षिणेतील द्राविडी भाषांची वाढही त्याच वेळी होऊ लागली त्यांतील सर्वात जुनी जी तामीळ भाषा तिला मात्र मध्ययुगाच्या पुष्कळ पूर्वीपासून आकार प्राप्त होऊ लागला

15 एप्रिल, 1956 रोजी नवी दिल्ली येथे दुसऱ्या अखिल भारतीय पंजाबी परिषदेत केलेले भाषण

होता असे मानले जाते. या प्रश्नाकडे या दृष्टिकोनातून पाहिले म्हणजे आपल्या देशात केवळ संपूर्ण विचारस्वातंत्र्य नव्हे तर भाषेचेही स्वातन्त्र्य होते ही गोष्ट आपल्याला मान्य करावी लागेल. राज्याराज्यांत निरनिराळ्या कारणास्तव मतभेद आणि संघर्ष उद्‌भवले असतील. परंतु माझ्या माहितीप्रमाणे भाषा हे या संघर्षाचे कारण कधीच नव्हते. राजकीय उलथापालथ होत असताना व एकामागून एक अनेक राज्यांचा उदयास्त होत असताना सुद्धा भाषाचा त्याच्या क्षमतेप्रमाणे अनिर्बंध विकास होत होता. एवढेच नव्हे तर त्यांच्यातील देवाणघेवाण सतत चालू होती हे सिद्ध करणारा पुरेसा पुरावा देता येईल. एकापेक्षा जास्त भाषा ज्यांच्यावर आपला हक्क मागतात असे अनेक कवी आपल्यांत आहेत. उदाहरणार्थ, विद्यापती हा आपला कवी आहे असे हिंदी आणि बंगाली या दोन्ही भाषांच्या लोकाना वाटते. त्याचप्रमाणे हिंदी व गुजराती या दोन्ही लोकाना मीराबाई ही आपली कवयित्री वाटते. पंजाबी आणि हिंदी या दोन्ही भाषात काव्य करणाऱ्या कवींची संख्या बारापेक्षा जास्त आहे. पंजाबी भाषेचा विकास करणारे गुरू आणि त्यांचे अनुयायी याना हिंदी वाङ्‌मयातही मानाचे स्थान लाभले आहे. पंजाबी आणि हिंदी शब्दांच्या साधर्म्यावरून आणि या भाषांच्या इतिहासावरून त्यांचे आज सुद्धा जवळचे नाते आहे ही गोष्ट स्पष्ट होते.

हिंदी हळूहळू संपूर्ण भारताची भाषा बनून कालांतराने इंग्रजीचे स्थान तिला घ्यायचे आहे या अर्थात स्वतंत्र भारतात हिंदीच्या दर्जात काही बदल झाला आहे. इतर कोणत्याही भारतीय भाषेच्या वाङ्‌मयाप्रमाणे पंजाबी भाषेचे वाङ्‌मयसुद्धा आपला सामाईक राष्ट्रीय वारसा आहे. मला पंजाबी वाङ्‌मयाची फारशी माहिती नाही. परंतु मी इतके म्हणू शकतो की त्याची परंपरा निरोगी असून आपल्या राष्ट्रीय संस्कृतीशी आणि आकांक्षांशी ती जुळणारी आहे. भारत हा एक विशाल देश असून त्यात अनेक धर्मांचे लोक आणि अनेक भाषा बोलणारे लोक राहात आहेत. निरनिराळ्या भाषिक गटाना त्यांच्या भाषाचा व साहित्याचा विकास करायला येथे भरपूर वाव आहे. भारतातील सर्व भाषांचा विकास चालू राहील व आपल्या देशातील अज्ञान आणि निरक्षरता यांचा नायनाट करण्याच्या कामी त्या हातभार लावतील अशी आशा मी करतो.

•

## भारतीय ऐक्य

राज्य पुनर्रचनेच्या प्रश्नावर जे रण माजले आहे ते लक्षात घेता आपल्या देशात या टोकापासून त्या टोकापर्यंत भारात असलेल्या एकतेच्या जाणीवेवर

---

16 ऑगस्ट, 1956 रोजी मदुराई येथे एका सार्वजनिक सभेत केलेल्या भाषणातील उतारा.

पुन्हा एकदा भर देणे आवश्यक आहे. आपले ऐक्य ओघाने आलेले आहे व त्याचा विचार किंवा काळजी करण्याची आवश्यकता नाही असे आपल्याला वाटता कामा नये. तसेच सर्व प्रकारचे ताण सहन करता येईल इतका दृढ हा ऐक्यभाव आहे असेही आपण समज नये. सत्यस्थिती अशी आहे की आपली एकता जरी अत्यंत प्राचीन आणि भक्कम पायावर उभी असली तरी तिचे पोषण करून तिला जास्त मजबूत केले पाहिजे. आपल सांस्कृतिक ऐक्य अत्यंत प्राचीन असले तरी त्याने राजकीय ऐक्य साधले नाही आणि अनेक परकीय आक्रमणांना आपण बळी पडलो हे आपल्याला माहीत आहे. सुदैवाने आता आपण राजकीय ऐक्यसुद्धा संपादन केले आहे. या परिस्थितीत आपले राजकीय आणि सांस्कृतिक ऐक्य जास्त मजबूत करणे आणि टिकविणे अधिक सोपे आहे. परंतु कधी-कधी राजकारणामुळे अनर्थ होतो, म्हणून त्यापासून सावध राहणे जरूर आहे.

या राजकीय ऐक्याविषयी सतत जागरूक राहण्याची गरज नाही असे आपण समजता कामा नये. जर हे राजकीय ऐक्य नाहीसे झाले तर आपली स्थिती काय होईल याची कल्पना करा. भारत हा जगातील दुसऱ्या क्रमांकाचा मोठा देश आहे. इतकी मोठी लोकसंख्या असलेला आणि एकच घटना व एकच मंत्री-मंडळ यांच्याकरवी शासित होणारा चीनखेरीज दुसरा कोणताही देश नाही. जवळ-जवळ 18 कोटी लोकांना मतदानाचा हक्क मिळाला अशा निवडणुकीसारखी निवडणूक दुसरीकडे कोठे झाली असेल असे मला वाटत नाही. आणखी काही महिन्यांनी दुसरी सार्वत्रिक निवडणूक होईल.

छत्तीस कोटीहून जास्त लोकसंख्या असलेला भारत आजच्या जगात फार मोठे कार्य करू शकेल. परंतु आपण पुन्हा एकमेकांपासून दुरावलो आणि एकच अविभाज्य भारत राहण्याऐवजी अनेक स्वतंत्र राज्ये निर्माण झाली तर काय होईल याची कल्पना करा. आज आपण 36 कोटी लोकांनी एकजुटीने राहणे आवश्यक आहे. एकता म्हणजे कंटाळवाणा एकसारखेपणा नव्हे. भिन्नतेतही एकता असणे हे आपल्या राष्ट्राचे वैशिष्ट्य आहे. रत्नजडित हारामध्ये प्रत्येक रत्नाला त्याचे विशिष्ट स्थान व महत्त्व आहे. संपूर्ण हार मौल्यवान असतो. तसाच तो अत्यंत सुंदरही असतो. आपला भारतही याच हारासारखा आहे यातील कोणतेही रत्न आपण तोडता कामा नये. यातील प्रत्येक रत्नाचे स्थान, त्याचे वैभव आणि सौंदर्य आपण अबाधित ठेवले पाहिजे असे केल्यानेच तो हार जास्तीत जास्त चित्ताकर्षक होईल आपल्यात अनिष्ट स्पर्धा होण्याचे काही कारण नाही. आपण सर्वांनी एकमेकांशी सहकार्य केले पाहिजे कारणपरत्वे काही मतभेद होतात हे मी जाणतो. ते टाळता येणे अशक्य आहे परंतु आपण त्यांना आटोक्यात ठेवले पाहिजे त्याच्यामुळे देशाचे मूलभूत ऐक्य नष्ट होऊ देता कामा नये. महात्मा गांधी आम्हाला सांगत असत, "नेहमी घेण्यासाठी नव्हे तर देण्यासाठी तयार असा". हे तत्त्व केवळ व्यक्तीलाच नव्हे तर समूह आणि समाज यांच्याकरितामुद्धा आहे. प्रत्येक गटाने जर दुसऱ्या गटाचा विचार केला तर दुर्लक्षित असा एकही गट राहणार नाही. दुसऱ्याचा विचार न करता आपण आपल्या विशिष्ट गटापुरताच

विचार करतो यामुळेच उपद्रव होतो. याचा परिणाम असा होतो की तो गट एकटाच आपल्या हितसंबंधांचे रक्षण करण्याचा प्रयत्न करतो आणि इतर कोणाहीबद्दल आस्था वाटेनाशी होते. जर प्रत्येक गटाने स्वतःचा विचार न करता दुसऱ्याचा विचार केला तर प्रत्येक गटाचा, तो गट सोडून इतर सर्वजण विचार करतील. यामुळे परिस्थिती पुष्कळ बदलेल. म्हणून आपण लहान लहान गटांचा नव्हे तर संपूर्ण राष्ट्राचा विचार केला पाहिजे. काही खेदजनक घटना अलीकडेच घडल्यामुळे, याची आज जास्त जरूरी भासते. आजची स्थिती क्षणिक ठरेल अशी मला आशा वाटते.

सुदैवाने येथे असा उपद्रव झाला नाही आणि पुढेही होणार नाही अशी मी आशा करतो. तुम्ही सर्व देशाचाच विचार कराल अशी माझी खात्री आहे. जर तुम्ही या कोपऱ्यापासून भारताचा नकाशा पाहिला तर तुम्हाला दिसून येईल की तुम्ही पायथ्याशी तरी आहात किंवा शिखरावर तरी आहात. तुम्ही कोठेही असला तरी तुमची जबाबदारी मोठी आहे. जर तुम्ही पायथ्याशी असाल तर सबंध शरीराचे ओझे तुम्हाला वहावे लागेल व जर तुम्ही शिखरावर असाल तर डोक्याला जे काम करावे लागते ते काम तुम्हाला करावे लागेल. म्हणून तुम्ही देशाला कधीही विसरणार नाही किंवा देशहिताकडे दुर्लक्ष करणार नाही अशी मला आशा वाटते. आपल्याला जगात मोठे स्थान प्राप्त होत आहे. आपले पंतप्रधान जागतिक शांतता प्रस्थापित करण्याकरिता तनमनधनपूर्वक कार्य करीत आहेत. आपल्या स्वतःच्या देशात कोणताही उपद्रव नाही याबद्दल त्यांची खात्री झाली तर हे कार्य ते किती नेटाने आणि प्रभावीपणे करू शकतील याची कल्पना तुम्ही करू शकाल.

सध्या आपण दुसरी पंचवार्षिक योजना पुरी करण्याच्या कामी गुंतलो आहोत. आपल्याला वाटले होते त्यापेक्षा जास्त यशस्वी रीतीने पहिली पंचवार्षिक योजना पार पडली आहे दुसरी योजना त्याहीपेक्षा जास्त यशस्वी रीतीने पार पडेल अशी आशा आपण करू या. योजनेच्या कामी जर सर्व लोकांनी सहकार्य दिले तरच हे शक्य आहे. देशाच्या निरनिराळ्या भागाच्या विकासात समतोलपणा राखण्याचा जे प्रयत्न करीत आहेत ते एखाद्या भागाचे हित साधण्याकरिता इतर भागाकडे दुर्लक्ष करणार नाहीत याची तुम्ही खात्री बाळगा. परंतु प्राधान्यक्रम या नावाची एक गोष्ट असते. आपण मंदिरात जातो तेव्हासुद्धा प्रत्येकाला एकाच वेळी देवाचे दर्शन घेता येत नाही. त्याचप्रमाणे जेव्हा आपण नदीवर स्नानास जातो तेव्हा नेहमीच सर्वांना एकदम स्नान करणे शक्य होत नाही. आपली पाळी येईपर्यंत रांगेत उभे राहावे लागते. याचा अर्थ तुमच्याकडे दुर्लक्ष होत आहे असा नाही. याचा अर्थ एवढाच की प्रत्येकाला संधी मिळावी म्हणून उपाय योजले जात आहेत. असे केल्याशिवाय सर्वांना समान संधी मिळणार नाही. त्याचप्रमाणे पंचवार्षिक योजनाच्या बाबतीत प्रत्येकाचा विचार करायचा आहे. परंतु तो एकाच वेळी करता येणार नाही आणि कोणाकडेही दुर्लक्ष होणार नाही, याबद्दल तुम्ही खात्री बाळगा.

## हिंदीने आपले दरवाजे खुले ठेवले पाहिजेत

या राज्यात गेली वीस वर्षे राष्ट्रभाषेचा प्रचार करण्याचे काम चालू आहे. या काळात किती प्रगती झाली हे आपल्याला अगोदरच सांगितले आहे. स्वातंत्र्य मिळाल्यापासून हे काम शक्य तितक्या शीघ्र गतीने करण्यात यावे म्हणजे निरनिराळ्या क्षेत्रांत, आंतरराज्यीय व्यवहारात माध्यम म्हणून हिंदीचा वापर करता येईल, असे स्वातंत्र्यानंतर वाटू लागले.

यासंबंधात आपण काही गोष्टींची आठवण ठेवली पाहिजे कारण ज्यामुळे अडचणी उद्भवतील असे गैरसमज टाळणे आवश्यक आहे. प्रथम हिंदी बोलणाऱ्यांनी ही गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे की कोणत्याही प्रादेशिक भाषेच्या ऐवजी किंवा तिची हानी करून त्यांनी हिंदीचा प्रचार करता कामा नये. या सर्व भाषा त्या त्या प्रदेशात चालूच ठेवायच्या आहेत इतकेच नव्हे तर त्यांचा विकास करून त्यांना संपन्न कसे करायचे हे पद्धतशीरपणे ठरवायचे आहे आणि या कामी सर्व लोकांनी मदत केली पाहिजे. या गोष्टीकडे दुर्लक्ष झाले तर हिंदी न बोलल्या जाणाऱ्या भागात हिंदीचा प्रचार लोकप्रिय होण्याऐवजी त्याला विरोध होईल. म्हणून हिंदीला उत्तेजन देत असताना प्रादेशिक भाषांच्या प्रगतीला खीळ पडेल असे काहीही घडता कामा नये. आणि त्या भागात केवळ आंतरराज्यीय व्यवहारासाठीच हिंदी वापरायची आहे याची स्पष्ट जाणीव असली पाहिजे. प्रादेशिक भाषा आणि हिंदी या प्रतिस्पर्धी म्हणून उभ्या असलेल्या आपल्याला कधीकधी दिसतात पण वास्तविक त्यांचा खरा प्रतिस्पर्धी हिंदी नव्हे तर इंग्रजी भाषा आहे. सर्व राज्यात विद्यापीठे स्थापन केली जात आहेत. ती प्रादेशिक भाषांना उत्तेजन देत आहेत. या भाषांचा पद्धतशीरपणे विकास करणे व त्यांचे वाङ्मय संपन्न करणे हे या विद्यापीठाचे पहिले कर्तव्य आहे. यापैकी काही विद्यापीठांनी शिक्षणाचे माध्यम म्हणून यापूर्वीच प्रादेशिक भाषा स्वीकारल्या आहेत. आणि ज्या विद्यापीठात हे घडले नाही तेथे आज ना उद्या प्रादेशिक भाषा हे माध्यम म्हणून स्वीकारले जाईल असे खात्रीने म्हणता येईल. म्हणून विद्यापीठांतून जेव्हा इंग्रजी माध्यमाचे उच्चाटन होईल तेव्हा इंग्रजीची जागा हिंदीच घेईल असे समजणे चुकीचे आहे. तुमचे राज्य द्वैभाषिक असल्यामुळे हिंदी व मराठी यांना विद्यापीठातील माध्यम म्हणून मान्यता मिळालेली आहे आणि सरकारी कचेऱ्यांत आणि विद्यापीठांत अधिकाधिक काम या भाषांतून होऊ लागले आहे. मध्यप्रदेशाचा हा भाग जेव्हा दुसऱ्या राज्याला जोडला जाईल तेव्हा सुद्धा हे कार्य अशेच वेगाने चालू राहील. तसे सुद्धा मराठी व गुजराती या दोन प्रादेशिक भाषांना विद्यापीठात सर्वोच्च स्थान राहील. पुणे व गुजरात या विद्यापीठांनी इंग्रजी ऐवजी अनुक्रमे मराठी व गुजराती या भाषा यापूर्वीच स्वीकारल्या आहेत. या भाषांचा विकास करून त्या संपन्न करणे हे आपले एक मुख्य ध्येय असल्याचे मा

---

13 नव्हेंबर, 1956 रोजी राष्ट्रभाषा प्रचार समितीच्या इमारतीची कोनशिला बसवताना केलेल्या भाषणातून.

विद्यापीठांनी मान्य केले आहे. त्याचप्रमाणे जेथे मराठी बोलली जाते तेथे इंग्रजीची जागा मराठी घेईल: जेथे हिंदी बोलली जाते तेथे हिंदी आणि दक्षिणेत तेथील चार भाषा इंग्रजीची जागा घतील. परंतु अखिल भारतातील लोकांशी संपर्क ठेवण्यासाठी इंग्रजीची जागा हिंदी घेईल. राष्ट्रभाषेला यापेक्षा जास्त महत्त्व देणे माझ्या मत जरूरही नाही आणि इष्टही नाही. यासंबंधात जर काही गैरसमज असतील तर ते दूर करणे हे हिंदी बोलणाऱ्यांचे व प्रचार करणाऱ्यांचे कर्तव्य आहे.

दुसऱ्या एका गोष्टीकडे आपण सतत लक्ष दिले पाहिजे ती म्हणजे सर्व भारतीय भाषांचा विकास करणे व त्याचे वाड्‌मय संपन्न करणे आवश्यक आहे. 1936 मध्ये यथे भरलेल्या हिंदी साहित्य संमेलनांत अध्यक्षीय भाषण करताना अहिंदी शब्द हिंदीमधून काढून टाकणे हिंदी भाषेला हितावह नाही यावर मी भर दिला होता हिंदीमध्ये रूढ झालेले परकीय शब्द काढून टाकू नयेत व त्यांच्याएवजी दुसरे हिंदी किंवा संस्कृत शब्द घेऊ नयेत. आजसुद्धा माझे हेच मत आहे. इतर भाषातील जे शब्द हिंदीने आत्मसात केले आहेत किंवा ती करू शकते त्या शब्दासाठी हिंदीने आपले द्वार नेहमीच मोकळे ठेवले पाहिजे असे मला वाटते. इंग्रजीचे उदाहरण घ्या. जर तुम्ही इंग्रजी शब्दकोशाची अद्ययावत आवृत्ती व एखादी बरीच जुनी आवृत्ती यांची तुलना केली तर त्या भाषेत पुष्कळ नव्या शब्दांची भर पडल्याचे तुम्हाला दिसेल. काही दिवसांपूर्वी एक जुना शब्दकोश माझ्या पाहण्यात आला. त्याची पृष्ठसंख्या त्या शब्दकोशाच्या आजच्या आवृत्तीच्या पृष्ठसंख्येच्या जेमतेम एकदशांश होती. शिवाय नव्या आवृत्तीतील अक्षरेही बारीक होती. पुष्कळ नवीन शब्दांची भर पडल्यामुळे नवा शब्दकोश इतका मोठा झाला. मला असे सांगण्यात आले आहे की जेव्हा ऑक्सफर्ड शब्दकोश तयार केला जात होता तेव्हा शब्दकोशाच्या शेवटच्या पानाचा मजकूर जुळवला जात असताना सुद्धा, शब्दसंग्राहकाना बऱ्याच नवीन शब्दांना त्यात समाविष्ट करण्यासाठी पुरवणी जोडावी लागली. इंग्रजी ही जिवंत आणि वर्धमान भाषा आहे आणि सर्व बाजूनी तिची प्रगती होत आहे हे यावरून दिसून येते. आपल्या पंतप्रधानानी म्हटल्याप्रमाणे जगातील सत्तर टक्के शास्त्रीय आणि पारिभाषिक नियतकालिके इंग्रजीमध्ये छापली जातात. इंग्रजी भाषेच्या समर्थकांनी परकीय शब्दावर बहिष्कार टाकण्याच्या धोरणाचा स्वीकार केला असता आणि शेक्सपिअर व चॉसर यांच्या वेळचेच शब्द वापरण्याचे ठरविले असते तर त्या भाषेची इतकी विलक्षण प्रगती झाली नसती

नियमांचे काटेकोर पालन करण्याचा आग्रह सोडून दिला पाहिजे. काही मराठी आणि बंगाली बोलणाऱ्या लेखकांनी लिहिलेली हिंदी पुस्तके मी पाहिली आहेत. ते हिंदीचे विद्वान नाहीत तर फक्त त्यांच्या भाषांचे विद्वान आहेत या पुस्तकामध्ये त्यांची वशिष्ट्यपूर्ण शैली पहायला मिळते. आपण या विभिन्न शैलीचे कौतुक केले पाहिजे आणि त्यांना हिंदी साहित्याचा भाग मानले पाहिजे. हिंदीचा विकास करण्याचा आणि ती लोकप्रिय करण्याचा हाच मार्ग आहे असे मला वाटते.

काही लोक हिंदीला अनुकूल नाहीत असे आपण ऐकतो. इंग्रजी भाषा हिंदी-पेक्षा जास्त मोठ्या भागात समजली जाते आणि इग्रजीशिवाय आपले चालणार नाही असे हे लोक म्हणतात. उत्तरेकडील आणि इतर ठिकाणाच्या हिंदी संस्था-प्रमाणेच दक्षिण भारत हिंदी प्रचार सभेशीही माझे निकटचे संबंध आहेत तिच्या कार्यात मी भाग घेतलेला आहे. गेल्या महिन्यात मी जेव्हा तेथे गेलो होतो तेव्हा श्री० एम्. सत्यनारायण यांनी मला सांगितले की तामीळ, तेलुगु, कानडी आणि मल्यालम या चार भाषा बोलल्या जाणाऱ्या प्रदेशात इंग्रजी जाणणाऱ्यांची संख्या दहा लक्षापेक्षा अधिक नाही अगदी अलिकडच्या खानेसुमारीवरुन त्यांनी हे आकडे उद्धृत केले उलट, हिंदी जाणणाऱ्या लोकांची संख्या पन्नास लक्षापेक्षा कमी नाही म्हणजे हिंदी जाणणाऱ्या लोकांची संख्या इंग्रजी जाणणाऱ्या लोकांच्या संख्येच्या पाचपट आहे. तेव्हा दक्षिणेकडील लोकांना हिंदी समजत नाही असे आपण कसे म्हणू शकतो? त्यांच्यापैकी काही लोक इंग्रजीचे विद्वान आहेत. परंतु त्यांच्यापैकी जे हिंदी शिकतात त्यांचे ज्ञान सर्वसामान्यपणे विद्वानात गणना करण्याइतके नसते ही बाब वेगळी हिंदीचा कसोशीने अभ्यास करणे सध्या आवश्यक नाही हे कदाचित त्याचे कारण असेल वर्तमानपत्रे आणि सरकारी कामकाज यासाठी अद्याप इंग्रजी भाषा उपयोगात आणली जाते त्यामुळे इंग्रजीचा उपयोग अधिक होतो आणि हिंदीचा अभ्यास केलेल्या व हिंदीच्या निरनिराळ्या परीक्षा दिलेल्या लोकांच्या संख्येपेक्षा इंग्रजी समजणाऱ्या लोकांची संख्या जास्त आहे असा भ्रम निर्माण होतो. मी दिलेले आकडे खरोखर आश्चर्यजनक आहेत. सरकारी भाषा मंडळाचा अहवाल जेव्हा प्रसिद्ध होईल तेव्हा आणखी काही माहिती उजेडात येईल अशी मला आशा वाटते ते काहीही असो, हिंदीला आपली राष्ट्र-भाषा करणे फार कठिण आहे असे मला वाटत नाही

काही वेळा असे म्हटले जाते की हिंदीचा अभ्यास करण्याची सक्ती नसल्यामुळे जास्त लोक तिचा उपयोग करीत नाहीत काही वर्षांपूर्वी मद्रासमध्ये हा प्रश्न उपस्थित झाला होता सरकारने हिंदी शिकण्याची सक्ती न करता प्रत्येक शाळेत हिंदी शिक्षकाची नेमणूक केली या व्यवस्थेप्रमाणे सुद्धा मद्रासमध्ये सत्तर ते ऐंशी टक्के विद्यार्थी हिंदीचा अभ्यास करीत आहेत हिंदी हा विषय ऐच्छिक असून सुद्धा त्याचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांचे प्रमाण इतके मोठे असावे हा शुभशकुनच म्हटला पाहिजे. हिंदी प्रचार कार्याची संपूर्ण देशात जलदीने प्रगती होत राहील अशी आशा आपण करू या. गुजरातमध्ये आणि महाराष्ट्रात पुष्कळ लोकांना हिंदी येते

त्यामुळे तेथे हे कार्य मुळीच कठीण वाटू नये. महाराष्ट्रात जे हिंदी जाणत नाहीत त्यांचा मुद्दा या कार्याला विरोध नाही. लोकांनी आपल्या मातृभाषेचा त्याग करावा असे कोणीही म्हणत नाही. उलट देशात बोलल्या जाणाऱ्या सर्व भाषांना सर्वांगीण प्रगती करण्याची संधी दिली पाहिजे. त्यांचे वाङ्मय संपन्न केले पाहिजे आणि त्याचबरोबर हिंदी न बोलल्या जाणाऱ्या प्रदेशात केवळ संपूर्ण भारताच्या आणि आंतरराज्यीय कामकाजासाठी हिंदीचा वापर करण्यात आला पाहिजे. या दिशने चालणाऱ्या तुमच्या प्रयत्नांना यश लाभो अशी आशा मी व्यक्त करतो.

## संस्कृतचे विशेष स्थान

संस्कृत भाषा आणि वाङ्मय लोकप्रिय करण्याचे ध्येय पुढे ठेवून त्या दिशेने संस्कृत विश्व परिषद हळूहळू प्रगती करीत आहे ही गोष्ट समाधानकारक आहे. विद्यापीठातील विद्यार्थ्यांमध्ये अभ्यासाचा एक विषय म्हणून संस्कृत अधिकाधिक लोकप्रिय होत आहे. सामाजिक आणि राजकीय क्षेत्रात सुद्धा हा एक चर्चेचा विषय झाला आहे. कदाचित या जागृतीमुळे व या परिषदेच्या कार्यामुळे, संस्कृतच्या अभ्याससंवर्धनाच्या सर्व प्रश्नांचा विचार करण्यासाठी सरकारने अलीकडेच एक मंडळ नेमले आहे. तिची उपयुक्तता व तिचा प्रसार या दृष्टिकोनातून हे मंडळ या प्रश्नांचा विचार करील आणि केवळ संस्कृत भाषा व तिचे वाङ्मय इतकेच नव्हे तर आपले राष्ट्रीय जीवनसुद्धा ज्यायोगे संपन्न होईल अशा शिफारशी ते करील अशी मला आशा वाटते. भारतीय भाषा आणि संस्कृत यांच्या अभ्यासाकडे आपले लोक आणि सरकार जास्त लक्ष पुरवू लागले आहेत हे पाहून आम्हाला आनंद वाटतो. आज जशी कुरुक्षेत्र विद्यापीठाची स्थापना झाली तशीच प्राचीन काळापासून संस्कृतच्या अध्ययनासाठी प्रसिद्ध असलेल्या काशीमध्येही एका संस्कृत विद्यापीठाची स्थापना करावयाचे ठरले आहे.

परिषदेच्या प्रयत्नामुळे सुशिक्षित लोकांना संस्कृतच्या अभ्यासाचे महत्त्व पटले असले तरी या लोकांचा कल संस्कृतकडे जितका आहे तितकाच तो सर्वसामान्य लोकांचा आहे असे म्हणता येणार नाही. आजच्या गरजा लक्षात घेऊन संस्कृत शक्य तितक्या सोप्या रीतीने शिकविले जावे असे मला वाटते. प्राचीन वाङ्मयाचा अभ्यास अत्यंत महत्त्वाचा आहे यात मुळीच शंका नाही परंतु आजच्या विद्यार्थ्यांचे केवळ एवढ्यावरच समाधान होणार नाही. तो जे जीवन जगतो त्याच्या जवळ नेणाऱ्या व जीवनातील अडचणी आणि प्रश्न यांना तोंड देऊ शकेल असे सामर्थ्य त्याच्यात निर्माण करू शकणाऱ्या साहित्याचा अभ्यास करावयाची त्याची इच्छा असते.

अभ्यासाचा एक महत्त्वाचा विषय म्हणून संस्कृतला मान्यता मिळविण्याविषयी बोलायचे म्हणजे संपूर्ण देशात सुचिन्हे आढळून येत आहेत. देशात बोलल्या जाणाऱ्या

---

11 जानेवारी, 1957 रोजी कुरुक्षेत्र येथे संस्कृत विश्व परिषदेच्या उद्घाटनाच्या वेळी केलेले भाषण.

कोणत्याही भाषेवर आक्रमण करण्याची इच्छा नसलेल्या संस्कृत भाषेला आपल्या सांस्कृतिक आणि धार्मिक जीवनात विशेष स्थान आहे. आपल्या राजकीय जीवनातहि तिला तितकेच महत्त्व आहे असे म्हटल्यास ते चुकीचे ठरणार नाही. कारण या देशाच्या निरनिराळ्या प्रदेशांना एकत्र ठेवण्याचे काम हजारो वर्षांपासून जर कोणी केले असेल तर ते संस्कृतने. जरी कालांतराने आपल्या अभ्यासक्रमात संस्कृतला तितकेच महत्त्वाचे स्थान राहिले नाही तरी आपल्या सामाजिक, सांस्कृतिक आणि धार्मिक जीवनात आजही तिला सर्वात श्रेष्ठ स्थान आहे. देशातील लोकांमध्ये ऐक्यभाव निर्माण करणारे साधन म्हणून संस्कृतचे महत्त्व आज सुद्धा अजिबात नाहीसे झालेले नाही, असे म्हणणे बरोबर ठरेल

आपल्या जीवनात संस्कृतला पुन: एकदा तिचे योग्य ते स्थान मिळेल अशी आशा मी करतो.

---

## एकच लिपी का असावी ?

मी तेलुगु भाषेत भाषण करू शकत नाही याबद्दल प्रथमच मी दिलगिरी व्यक्त करतो. आपल्या देशातील जास्तीत जास्त भाषा शिकण्याचे आपण आता ठरविले आहे. परंतु हा निर्णय अशा वेळी झाला आहे की ज्या वेळी माझे वय कोणतीही नवी भाषा शिकण्याच्या दृष्टीने फार जास्त झाले आहे. श्रोत्यापैकी बऱ्याच जणांना हिंदी समजणार नाही असे मला समजले आहे म्हणून मी हिंदीमध्येही भाषण करू शकत नाही व याबद्दलही मला तुमची क्षमा मागितली पाहिजे. परंतु एका भारतीयाला दुसऱ्या भारतीयाशी बोलताना परकीय भाषा वापरण्याची गरज राहणार नाही अशी वेळ लौकरच येईल अशी मला आशा वाटते गांधीजींनी जेव्हा दक्षिणेकडे हिंदी प्रचार सुरू केला तेव्हा त्यांचे हेच स्वप्न होते जेव्हा देशाची घटना तयार करायची वेळ आली तेव्हा आपल्या कामकाजासाठी परकीय भाषेचा उपयोग जास्त काळ करता येणार नाही याची आपल्याला जाणीव झाली याच कारणासाठी घटना तयार करणाऱ्यांनी अखिल भारतीय स्वरूपाच्या कामकाजासाठी हिंदी भाषेचा स्वीकार केला त्याचबरोबर घटनेत असे नमूद करण्यात आले की प्रांतिक भाषांनाही प्रोत्साहन देऊन त्यांचा दर्जा उंचावण्याचा प्रयत्न करण्यात यावा यासाठी भारत सरकारने एक राष्ट्रीय साहित्य अकादमी स्थापन केली. कोणत्याही विशिष्ट राज्यातील भाषेचा नव्हे तर सर्व भाषांचा विकास घडवून आणावा व त्यांच्या साहित्यात जे काही सर्वोत्कृष्ट असेल त्याची देवाणघेवाण करावी, हा या अकादमीचा उद्देश आहे सर्व भारतीय भाषांमधील तसेच परकीय भाषांतील अभिजात साहित्याचा भारतीय भाषांमध्ये अनुवाद करण्याला प्रोत्साहन दिले जात आहे प्रत्येक भाषेच्या सर्वोत्कृष्ट लेखकांना बक्षिसे देण्याचा सरकारचा विचार आहे. तीन वर्षांपूर्वी साहित्य अकादमी ही अ॰भा॰ संस्था

---

हैदराबाद येथे 7 ऑगस्ट, 1957 रोजी आंध्र साहित्य अकादमीचे उद्‌घाटन करताना केलेले भाषण.

स्थापन करण्यात आली. काही राज्यांनीही आपापल्या भाषांच्या विकासासाठी अकादमी स्थापन केल्या आहेत. तुम्ही अशी अकादमी यापूर्वीच स्थापन न करण्याचे कारण योग्यच होते. कारण विशाल आंध्रच्या निर्मितीचे आपले स्वप्न साकार होण्याची तुम्ही वाट पाहात होता.

भारताच्या कोणत्याही भागावर हिंदी लादायचा कोणाचाही विचार नाही हे मी या प्रसंगी सांगणे उचित ठरेल. आपण परस्पराशी विशेषत: अखिल भारतीय स्वरूपाच्या कामासाठी, मग ते राजकीय असो, राज्यकारभारविषयक असो किंवा व्यापारविषयक असो, भारतीय भाषेचा उपयोग केला पाहिजे. अनेक भाषा बोलल्या जात असलेल्या भारतासारख्या विशाल देशात, जास्तीत जास्त लोकांना जी भाषा समजते तीच राष्ट्रभाषा म्हणून स्वीकारली पाहिजे. आपल्या देशात जास्तीत जास्त लोकांना समजणारी भाषा, हिंदी आहे हा केवळ योगायोग आहे. याच कारणास्तव सरकारी भाषा म्हणून तिचा स्वीकार करण्यात आला. ही भाषा जाणणाऱ्यांची संख्या मोठी आहे केवळ याच कारणास्तव घटना तयार करणाऱ्यांनी देशाची भाषा म्हणून हिंदीला मान्यता दिली. आपल्यावर हिंदी लादली जात आहे असे काही भागातल्या लोकांना अजूनही वाटत असले तरी अशा लोकांपैकी तुम्ही नाहीत, हे मी माझ्या वैयक्तिक अनुभवावरून सांगतो. 20 वर्षांपूर्वी सुद्धा, काँग्रेसचा अध्यक्ष या नात्याने जेव्हा मी या भागाचा दौरा केला व अनेक सभात भाषणे केली तेव्हाही बहुतेक ठिकाणी मी इंग्रजीऐवजी हिंदीतून बोलावे, अशी लोकांची इच्छा होती याची मला आठवण आहे याचे कारण स्पष्ट आहे.

बहुसंख्य श्रोत्यांना ना हिंदी ना इंग्रजी भाषा समजत होती व त्यांना माझ्या भाषणाच्या अनुवादाची वाट पहावी लागत होती ज्या लोकांना इंग्रजी समजत होते त्यांची संख्या, बहुधा हिंदी समजणाऱ्या लोकांइतकीच होती. तेव्हा भाषांतराकरिता त्यांना थांबावेच लागणार असल्यामुळे मी हिंदीत बोललो काय किंवा इंग्रजीत बोललो काय, काहीच फरक पडणार नव्हता. परंतु, हिंदी ही राष्ट्रीय भाषा असल्यामुळे त्यांनी ती पसंत केली. हिंदीविषयी तुम्हाला किती प्रेम वाटते याची मला त्या वेळी प्रथम जाणीव झाली हीच भाषा नंतर राष्ट्रभाषा म्हणून मंजूर करण्यात आली. त्या वेळेपासून, तुमच्याविषयीची माझी आदराची भावना कायम आहे

भारतासारख्या विशाल देशात अनेक भाषा आहेत यात आश्चर्य वाटण्यासारखे काही नाही. यूरोपमध्येही पुष्कळ भाषा आहेत व त्यांच्यापैकी काही भाषा बोलणाऱ्यांची संख्या, कोणत्याही भारतीय भाषिकांच्या संख्येपेक्षा पुष्कळ कमी आहे. तरीसुद्धा यूरोपने या सर्व भाषांचे जतन केले आहे अनेक भाषा असून सुद्धा आपल्या पूर्वजांनी आपला देश एक ठेवला यावरून त्यांचा शहाणपणा व दूरदर्शीपणा दिसून येतो. त्यांनी आपल्यामध्ये ऐक्यभाव निर्माण करणारे उपाय योजले व ज्या आपत्तींसमोर इतर कोणतेही राष्ट्र टिकून राहिले नसते अशा

सर्व प्रकारच्या आपत्तींना तोंड देऊन आज सुद्धा आपण एक राष्ट्र म्हणून जगत आहोत. आता आपण राजकीय स्वातंत्र्यही संपादन केले असल्यामुळे, ज्यायोगे आपले स्वातंत्र्य चिरकाल टिकून राहील अशा रीतीने आपण आपले आचरण ठेवणे व आपली कामे करणे आता आवश्यक आहे. देशातील सर्व लोकांना, मग त्याची भाषा व त्याच्या चालीरीती कोणत्याही असोत, जास्तीत जास्त विकास करण्याच्या सवलती व संधी मिळाल्या पाहिजेत.

हे एकीकरण आणखी दृढ कसे करता येईल, याचा विचार मी करीत आलो आहे. या कार्यात मला जो काही थोडा अनुभव प्राप्त झाला तो तुमच्यासमोर मांडायची माझी इच्छा आहे. अनेक वर्षांपूर्वी, देवनागर या नावाचे एक प्रकाशन निघत होते. कलकत्ता वरिष्ठ न्यायालयाचे एक न्यायाधीश श्री० शारदाचरण हे ते चालवीत असत. या प्रकाशनात भारतातील निरनिराळ्या भाषांतील लेख छापले जात असत. परंतु ते देवनागरी लिपीत छापले जात असत. देवनागरी लिपीमुळे इतर भाषांची बरीच माहिती होते असे आम्हाला आढळले. तेव्हापासून मला असे वाटत आले आहे की सर्व भारतीय भाषा एकाच लिपीत लिहिल्या तर त्या अधिक चांगल्या रीतीने समजू शकतील. सुदैवाने, तामीळ खेरीज सर्व भारतीय भाषांची वर्णमाला एकच आहे. भारतातच नव्हे तर भारताच्या बाहेरही हीच स्थिती आहे. उदाहरणार्थ लंका, ब्रम्हदेश व थायलंड या देशांची वर्णमाला, आपल्यासारखीच आहे. त्यांची लिपी वेगळी आहे. परंतु ध्वनी तेच आहेत ही आपल्याला फायद्याची गोष्ट आहे. सर्वांना स्वीकारता येईल अशी एक लिपी आपण स्वीकारली तर एका भाषेच्या लोकांना इतर भाषा बोलणाऱ्या लोकांचा परिचय अधिक सुलभ रीतीने होईल. हे ज्या दिवशी घडून येईल तो दिवस सोन्याचा ठरेल.

मी ज्या नियतकालिकाचा उल्लेख केला आहे ते सुमारे 40 वर्षांपूर्वी निघत होते. 4–5 वर्षांपूर्वी नव्या संसदेचे सभासद मला भेटले त्या वेळी मी त्यांना असे सुचविले की त्यांना हे नियतकालिक पुन्हा सुरू करता येईल. त्यांनी माझी सूचना मान्य केली व "देवनागर" पुन्हा सुरू करण्यात आले आहे. शारदाचरणांच्या देवनागरात, निरनिराळ्या भाषांमधील लेख देवनागरी लिपीत छापले जात होते परंतु आजच्या देवनागरात, निरनिराळ्या भाषांतील लेख त्यांच्या अनुवादासह दिले जातात. हिंदी लेखाचे तामीळमध्ये, तामीळ लेखाचे तेलुगुमध्ये, तेलुगु लेखाचे गुजरातीत, बंगाली लेखाचे मराठीत अशा रीतीने भाषांतर केले जाते परंतु हे सर्व लेख देवनागरी लिपीत छापले जातात. या कल्पनेचा विचार करण्यासाठी मी ती येथील विद्वान मंडळींसमोर मांडत आहे. लिपीची अडचण नसती तर आपण आपल्या साहित्याचा आणखी विकास करू शकलो असतो असे मला वाटते. मी देवनागरी लिपीचा उल्लेख करीत आहे कारण संस्कृत नेहमी देवनागरी लिपीतच लिहिली गेली व संपूर्ण देशाला ती परिचित आहे. परंतु माझा या लिपीबद्दल आग्रह नाही. व्यवहार्य अशी इतर कोणतीही

लिपी तुम्ही स्वीकारू शकता. माझी जर कोणती इच्छा असेल तर ती ही आहे की आपण संपूर्ण देशासाठी एकच लिपी स्वीकारली पाहिजे म्हणजे मग एका भाषेच्या लोकांना दुसरी कोणतीही भाषा वाचता येईल. उच्च अधिकारपदावरील एक व्यक्ती या नात्याने नव्हे तर आपल्या देशाच्या ऐक्याविषयी आस्था बाळगणारी एक व्यक्ती या नात्याने मी ही सूचना करीत आहे.

## युवक व सहिष्णुता

भारत पुरातन देश आहे हजारो वर्षांच्या त्याच्या इतिहासात अनेक मोठी साम्राज्ये उदयाला आली व ऱ्हास पावली. भौगोलिक मर्यादा विस्तार पावत जाण्याचा तसेच आकुंचन पावण्याचा अद्‌भुत प्रकारही त्याने अनुभविला आहे. कित्येक पुरातन देश व संस्कृती यांचे अस्तित्व आज केवळ इतिहासाच्या पुस्तकातच आढळते परंतु अनेक स्थित्यंतरे घडली असूनसुद्धा, सुदैवाने भारताची संस्कृती व परंपरा आजही जिवंत आहे. आपल्या परंपरेत व सांस्कृतिक विचारधारेत सामर्थ्य आहे आपल्या वैचारिक परंपरेतील सामर्थ्यानेच ही स्थित्यंतरे घडत असताना सुद्धा आपल्याला एकत्र ठेवले, आपले ऐक्य राखले आपले अस्तित्व टिकून राहण्याचे हेच मुख्य कारण आहे. अंत:करणाची विशालता व सहिष्णुता या दोन गोष्टींनी आपल्याला परस्परांशी निगडित ठेवले. व यामुळेच आपण नव्या विचारांना व मतांना आत्मसात करू शकलो.

भारत आता सार्वभौम लोकशाही प्रजासत्ताक झाला आहे. संपूर्ण देश एकाच प्रशासनाखाली व एकाच ध्वजाखाली बहुधा प्रथमच आला असून संपूर्ण देशात एकच घटना प्रथमच अमलात आली आहे. जुन्या पिढीतील लोकांनी आपल्या देशासाठी एक घटना तयार करून त्याला वैधानिक एकता प्राप्त करून दिली आहे हे ऐक्य दृढ करून त्याला मूर्त स्वरूप प्राप्त करून देणे हे मुख्यत्वेकरून देशातील युवकांचे कार्य आहे तुम्ही जीवनाविषयी विशाल दृष्टिकोन बाळगला व निराग्रही वृत्ती अंगी बाणवली तर हे कार्य तुम्हाला यशस्वी रीतीने करता येईल. संकुचित वृत्तींचा त्याग करून, समतेच्या तत्त्वाचा स्वीकार करून, जातीयता, जातीयवाद पूर्वग्रह, व प्रांतीयता यांना थारा न देऊन तुम्हाला आपले ध्येय साध्य करता येईल स्वतंत्र भारतात तुम्ही शिक्षण घेत आहात हे तुमचे भाग्य आहे साम्राज्यशाहीच्या ज्या लोकांना परकीयांनी चालविलेल्या संस्थांमध्ये शिक्षण घ्यावे लागले त्यांना या बाबतीत तुमचा हेवा वाटेल

आज संपूर्ण देश पुनर्रचनेच्या कार्यात व्यग्र आहे धरणे बांधली जात आहेत. कालवे खणले जात आहेत, मोठमोठे कारखाने उभारले जात आहेत, ग्रामोद्योगांचे पुनरुज्जीवन केले जात आहे, ग्रामीण भागातील लोकांना अधिक सुखसोयी पुरविल्या जात आहेत व देशाच्या आर्थिक विकासासाठी सर्व ते सर्व प्रयत्न

नवी दिल्लीमध्ये 1 नोव्हेंबर, 1957 रोजी आन्तरविद्यापीठ युवक महोत्सवाच्या उद्‌घाटनप्रसंगी केलेले भाषण

येते जात आहे. या कार्यात तुम्हालाही सहभागी होता येईल. शहरात किंवा खेड्यात जाऊन तुम्हाला काही कार्य करता आले तर ते फारच चांगले. परंतु तसे करता आले नाही तरी सुद्धा उदार वृत्ती अंगी बाणवून व त्यायोगे उदार वृत्तीला प्रोत्साहन देऊन तुम्हाला आपले कर्तव्य बजावता येईल. आज ना उद्या तुम्हाला मोठी जबाबदारी उचलावी लागणार आहे हे तुम्ही लक्षात ठेवा. तुम्ही राष्ट्राचे आधारस्तंभ आहात व पुनर्रचनेचे कार्य तडीला नेण्याची जबाबदारी तुम्हाला उचलावी लागणार आहे मिळालेल्या संधीचा जास्तीत जास्त उपयोग करून भारताला संपन्न करण्याचा आम्ही आपल्या परीने प्रयत्न केला. परंतु आपल्या देशातील युवक हीच आपली सर्वात मोठी संपत्ती आहे याविषयी आमच्या मनात कधीही शंका नव्हती. म्हणून आधुनिक परिस्थितीशी जुळेल अशा रीतीने आपल्या आचारविचारांना वळण लावीत असतानाच, आपल्या या पुरातन भूमीने जी ध्येये आपल्यासमोर ठेविली त्यांच्यावर अढळ श्रद्धा ठेवा अशी माझी तुम्हाला विनंती आहे.

## हिंदी, इंग्रजी व प्रादेशिक भाषा

लोकांना ज्ञानार्जनाची गोडी लावण्याच्या बाबतीतच नव्हे तर लोकांना निरनिराळ्या विषयांत पारंगत होता येण्याच्या बाबतीत शिक्षणाच्या माध्यमाला अत्यंत महत्त्वाचे स्थान आहे त्यामुळे विद्यापीठातील शिक्षणापर्यंतचे सर्व शिक्षण आपापल्या भाषातून देण्यात यावे असे आपल्या सरकारने ठरवावे यात आश्चर्य वाटण्यासारखे काही नाही हे साध्य होण्यासाठी वरच्या वर्गातील विद्यार्थ्यांच्या गरजा भागवू शकेल असे साहित्य निर्माण व्हावयास हवे यासाठी वेळ लागेल.

कोणतीही प्रादेशिक भाषा आणि हिंदी यामध्ये संघर्ष निर्माण होण्याचे कारण नाही. मला वाटते की जर संघर्ष कोणात असेल तो भारतीय भाषा—हिंदी त्यातलीच एक आहे—आणि इंग्रजी यात आहे आणि तो सुद्धा सरकारी कामासाठी कोणती भाषा वापरावी याबद्दल आहे आपण आपल्या भाषा अशा प्रकारे समृद्ध केल्या पाहिजेत की जगातील अत्यंत संपन्न भाषामध्ये त्यांना स्थान मिळेल हीच आजची गरज आहे त्या तितक्या समृद्ध करता येतील, यात मला शंका वाटत नाही. त्यातील बऱ्याच भाषा संस्कृतोद्भव असल्यामुळे आवश्यक त्या पारिभाषिक शब्दांची उणीव संस्कृतसारख्या संपन्न भाषेच्या साहाय्याने लवकरच भरून काढता येईल. पारिभाषिक शब्दासाठी आपण एखाद्या विशिष्ट भाषेचाच आग्रह धरता कामा नये ते शब्द रूढ केले पाहिजे आणि एखादा इंग्रजी शब्द तसाच राहू दिला पाहिजे असे वाटण्याइतका तो रूढ झाला असेल तर तो राहू देण्यात काहीच हरकत नाही संपूर्ण देशाच्या दृष्टीने सर्वात सोईस्कर आणि उपयोगी काय आहे हे पाहून सुवर्णमध्य साधला पाहिजे. तुमच्या संस्थेच्या कार्यामुळे लौकरच तेलुगु भाषा संपन्न करता येईल आणि आंध्रप्रदेशातील विद्यापीठात

हैदराबाद येथे 21 ऑगस्ट, 1959 रोजी तेलुगु विज्ञान व इतिहास अकादमीचे उद्घाटन करताना केलेले भाषण.

पदवीनंतरच्या आणि पदव्युत्तर शिक्षणातसुद्धा माध्यम म्हणून तिचा उपयोग करता येईल. आणि त्यायोगे महाविद्यालये आणि विद्यापीठे यातून शिक्षणासाठी परकीय भाषेचे माध्यम ठेवणे असमर्थनीय ठरेल, अशी मला आशा वाटते. एका स्वतंत्र देशाने स्वतःच्या राज्यकारभाराकरिता एका परकीय भाषेवर, मग ती कितीही संपन्न असो, अवलंबून राहावे ही कल्पनाच मी करू शकत नाही. परकीय, विशेषतः जिच्यापासून आपला पुष्कळच फायदा झाला आहे, अशी संपन्न इंग्रजी भाषा शिकण्यास आपण फाटा देता कामा नये. परंतु इंग्रजीला आपल्या स्वतःच्या भाषेपेक्षा वरचे स्थान देणे ही गोष्ट अगदी निराळी आहे. आपण जितक्या लवकर स्वभाषेचा स्वीकार करू तितके ते चांगले राहील. असे करण्याची आवश्यकता लोक समजू शकतील अशी मला खात्री वाटते कारण आपल्या देशातील ज्या मूठभर लोकांचे शिक्षण इंग्रजीतून झाले आहे केवळ तेवढेच लोक आता महत्त्वाचे नाहीत तर संपूर्ण बहुजनसमाज महत्त्वाचा आहे.

संपूर्ण भारताची भाषा कोणती असावी, याविषयी आपण मुळीच काळजी करण्याचे कारण नाही. प्रथम आपण राज्यांच्या भाषांचाच विचार करू आणि एकदा हा प्रश्न व्यावहारिक रीतीने सुटला, म्हणजेच आंध्रमध्ये तेलुगु, तामीळनाडमध्ये तामीळ, हिंदी भाषिकांच्या प्रदेशात हिंदी, महाराष्ट्रात मराठी, गुजरातमध्ये गुजराती, ओरिसात ओडिया, बंगालमध्ये बंगाली आणि आसाममध्ये आसामी, अशा प्रकारे भाषा उपयोगात येऊ लागल्या म्हणजे कोणतेही आडवाटी न येता सर्व भारताची भाषा कोणती असावी, याचा निर्णय आपण करू शकू. अशी मला आशा वाटते हिंदी भाषा इतर भाषांपेक्षा श्रेष्ठ किंवा अधिक संपन्न आहे म्हणून नव्हे तर व्यावहारिक कारणास्तव, अखिल भारतीय स्वरूपाच्या कामकाजासाठी ती स्वीकारण्यात आली आहे. कोणतीही अडचण न येता, इंग्रजीची जागा ती घेऊ शकेल म्हणून त्यासंबंधी भारताने बोलत राहावे इतकी घाई मला या गोष्टीची काळजी वाटत नाही. अखिल भारतीय कामकाजासाठी उपयोगात आणता येईल अशी दुसरी कोणतीही भाषा नाही व जेव्हा लोकांना, इंग्रजी व कोणतीही एक भारतीय भाषा, किंवा दोन भारतीय भाषांपैकी कोणतीही एक भाषा निवडावी लागेल तेव्हा एक भारतीय भाषाच ते पसंत करतील व ती हिंदीखेरीज दुसरी कोणतीही राहणार नाही याबद्दल मला मुळीच शंका वाटत नाही. असे झाले———आणि असे एक दिवस होईल———म्हणजे गतकाळात संस्कृत भाषेने संपूर्ण देशातील लोकांना एकत्र ठेवण्याचे जे कार्य केले तेच कार्य हिंदी करील.

## पुरातन ध्येये व वास्तवता

भारत हा विविध भाषांचा आणि विविध धर्मांचे पालन करणाऱ्या लोकांचा विशाल देश आहे. भारतीय संस्कृती, वाङ्मय आणि कला यांचा विकास होण्यासाठी त्यातील प्रत्येक भागाने पुष्कळ हातभार लावला आहे. मी जरी कर्नाटकाच्या

6 नोव्हेंबर, 1959 रोजी धारवाड येथे कर्नाटक विद्यापीठाच्या पदवीदान समारंभाच्या वेळी केलेले भाषण

इतिहासाचा सखोल अभ्यास केला नसला तरी मला त्याची थोर वाङ्मयीन परंपरा आणि महान साधुसंत आणि तत्त्ववेत्ते यांची माहिती आहे. तुमचे वाङ्मय महान ध्येयांनी आणि उदात्त भावनांनी ओतप्रोत भरलेले आहे. केवळ कर्नाटकाच्याच नव्हे तर दूरदूरच्या प्रदेशातील लोकांनाही टिकवून ठेवणाऱ्या प्रभावी शक्तींपैकी ही एक शक्ती होती. तिने सामाजिक जीवन संपन्न केले, परंपरेला उदात्त स्वरूप दिले आणि ललितकलांच्या विकासास अनुकूल परिस्थिती निर्माण केली. या घडामोडी कर्नाटकात झाल्या असल्या तरी त्याचा परिणाम संपूर्ण देशावर झाला.

भारतातील स्थानिक संस्कृतीत आणि परंपरेत मला जी विविधता आढळते तिने मी मोहून जातो. केवळ विविधताच चित्ताकर्षक नाही तर या सर्वांना एकत्र ठेवणारे काही मूलभूत विचार व समज हेही तितकेच चित्ताकर्षक आहेत.

या ऐक्याची पाळेमुळे, आपल्यापैकी बऱ्याच जणांना वाटतील त्यापेक्षा अधिक खोलवर गेली आहेत आणि त्याचे पोषण एकाच विचारधारेने, एकाच ध्येयाच्या प्रेरणेने व मानवी अस्तित्वाच्या हेतूवरील व त्याच्या ध्येयावरील सामाईक श्रद्धेने होत आहे. विचारांचा साचेबंदपणा भारताला माहीत नाही. भारताच्या तत्त्वज्ञानाने उत्तुंग शिखर गाठले व भारतीय तत्त्वज्ञानाच्या निरनिराळ्या संप्रदायांना आकार प्राप्त होऊ लागला तेव्हा सुद्धा भारतीय विचारसरणीचे अत्यंत मनोवेधक वैशिष्ट्य जर कोणते राहिले असेल तर ते म्हणजे संपूर्ण विचारस्वातंत्र्यावर आधारलेले विविधतेने नटलेले तिचे स्वरूप. षड्दर्शनांपैकी तीन दर्शने ईश्वराचे अस्तित्व न मानणारी आहेत असे म्हणता येईल तर उरलेल्या तीन दर्शनांतील—जी ईश्वराचे अस्तित्व मानतात—सर्वशक्तिमान परमेश्वराची कल्पना परस्परांपासून अगदी भिन्न आहे. या विचारस्वातंत्र्याचा याहून अधिक स्पष्ट पुरावा आणखी कोणता असू शकेल? अशी आश्चर्य वाटण्याइतकी विविधता आणि विभिन्नता असून सुद्धा तिच्यामुळे आपल्या सांस्कृतिक ऐक्याला कधीही बाध आला नाही. म्हणून आपल्या ज्या प्रारंभिक विचारांमुळे व तत्त्वांमुळे आपल्या संस्कृतीला बहुरंगी स्वरूप प्राप्त झाले, त्याचा पाया ज्यांनी घातला त्यांच्याविषयी आपण जितकी कृतज्ञता व्यक्त करू तितकी ती थोडीच. कर्नाटकात ज्या भक्तिमार्गी चळवळीचा प्रारंभ झाला तिने हे स्वरूप कायम राखण्यास पुष्कळ हातभार लावला.

आता आपल्याला राजकीय व घटनाविषयक स्वातंत्र्य मिळालेले असताना गतकाळात भारतीय लोकांच्या ज्या सर्जनशीलतेचा आविष्कार आपल्याला आपल्या देशात व परदेशातही पहावयास मिळतो त्या सर्जनशीलतेचा पुन्हा एकदा प्रकर्षाने आविष्कार होऊन, प्रेम, संयम व सहिष्णुता या आपल्या पुरातन तत्त्वांचे पुनरुज्जीवन होईल अशी आशा बाळगण्यात काही वावगे आहे असे मला वाटत नाही. प्रत्यक्ष व्यवहारात, ही ध्येये साकार होण्याच्या बाबतीत आज जितकी प्रगती झाली आहे तितकी ती मानवजातीच्या इतिहासात कधीही झाली नव्हती. या ध्येयांना आज जे आव्हान स्वीकारावे लागत आहे त्यापेक्षा अधिक मोठे आव्हान आपल्या देशाच्या इतिहासात यापूर्वी कधीही स्वीकारावे लागले नाही.

आज संपूर्ण जग, हळूहळू आपल्या ध्येयाकडे आकृष्ट होत असताना, ज्या ध्येयांनी आपल्याला जिवंत ठेवले आहे त्याच्याकडे आपण पाठ फिरविणे योग्य ठरणार नाही.

संस्कृती या विषयाला गौण स्थान देऊन, फुरसतीच्या वेळी विचार करण्याचा हा विषय आहे असे मानण्याची प्रवृत्ती काही लोकांची आहे. आणि जेव्हा आपण संस्कृतीला उपेक्षेच्या गर्तेतून बाहेर काढायचा विचार करतो तेव्हा आपण दुसऱ्या टोकास जाऊन बँडबाजा व जॅझ संगीत याच्याशी संस्कृतीची गल्लत करून तिची थट्टा करतो. ज्या गोष्टींमुळे करमणूक किंवा मनोरंजन होईल त्या गोष्टींचे संस्कृतीला वावडे असण्याइतकी ती रुक्ष आहे, असा माझ्या म्हणण्याचा अर्थ नाही. परंतु नाट्यप्रयोग म्हणजेच संस्कृती असे समीकरण मांडणे चूक आहे, यात शंकाच नाही.

एखाद्या समाजात किंवा देशात अनेक शतकांच्या अनुभवाने संपादन केलेल्या सामूहिक श्रद्धा व इच्छा आकांक्षा जी व्यक्त करते ती संस्कृती. आजच्या पिढीचा गतकाळातील पिढ्यांशी संबंध जोडणाऱ्या जीवनप्रवाहाचे ते एक अंग आहे. संस्कृतीची जडण व घडण ज्याच्यामुळे होते त्या गोष्टी नेहमीच डोळ्यांनी पाहता येत नाहीत परंतु या संस्कृतीरूपी वस्त्राचे रेशमी धागेदोरे कोणी तयार केले आहेत व हे वस्त्र विणण्याचे काम अखंडपणे कोण करीत आले आहे हे विचारवंतांना माहीत आहे. क्षणिक महत्त्वाच्या गोष्टींना कधीकधी सांस्कृतिक बाबींपेक्षा प्राधान्य द्यायला हवे हे मर्यादित अर्थाने खरे आहे. सांस्कृतिक बाबी गौण आहेत हेच काही याचे कारण नाही तर सांस्कृतिक बाबी मानवी प्रकृतीत इतक्या खोलवर रुजलेल्या आहेत की त्यांच्याकडे अल्पकाळ दुर्लक्ष झाले तरी त्यांची परागती होणार नाही हे त्याचे कारण आहे. उलट क्षणिक महत्त्व असलेल्या बाबींचे अस्तित्व महत्त्वाकरून वरपांगी असत व त्यांच्याकडे लक्ष न दिल्यास त्या नष्ट होतात. कोणत्याही देशाचे सामर्थ्य, त्याचे चारित्र्य जिवंत राहण्याची त्याची क्षमता जर कशावर अवलंबून असेल तर ती अखंड सांस्कृतिक प्रवाहावर. परंतु आपल्या दारिद्र्यामुळे व दैन्यामुळे, आपली संस्कृती अत्यंत संपन्न आहे हा आपला दावा व्यर्थ ठरतो आहे. संस्कृती व तिची संपन्नता याविषयीचे आपले विचार इतरांना समजावे व त्यांनी ते बहुमोल मानावे असे आपल्याला वाटत असेल तर आपण आपले विचार व आचार यांचा मेळ घातला पाहिजे. निरोगी सांस्कृतिक परंपरा व समृद्ध नसलेला समाज या गोष्टी एकत्र राहू शकत नाहीत. म्हणून मला नेहमी असे वाटत आले आहे की आपल्या समाजाची पुनर्रचना करून, देशात समृद्धसंपन्नतेचे नवे युग निर्माण करण्याचा सामूहिक प्रयत्न आपण केला पाहिजे. आपल्या सांस्कृतिक परंपरेपासून आपण स्फूर्ती घेतली व आपल्या मूलभूत तत्त्वानुसार आपण आपल्या जीवनाला वळण लावले तरच आपले प्रयत्न फलद्रूप होतील.

या कल्पनांचा प्रसार विद्यापीठांतून व्हावा असे मला वाटते. राष्ट्रपुरुषाच्या शरीराचे पोषण करणारा, सांस्कृतिक प्रवाहरूपी जीवनरस त्याला नीट मिळतो आहे की नाही हे पाहणे, विद्यापीठांचे कार्य आहे. कट्टर जडवादीसुद्धा विचाराची शक्ती किती प्रभावी असते हे अमान्य करणार नाही. सामान्य माणसालाही हे विचार समजू शकतील अशा स्वरूपात ते मांडणे, हे विद्यापीठाचे काम आहे.

— —

श्रद्धा निर्माण झाली व तिने ही श्रद्धा कायम राखली, मग तिचे उत्पत्तीस्थान कोणतेही असो. बौद्ध धर्माचा झपाट्याने प्रसार होण्याचे व धर्माच्या बाबतीत वैयक्तिक स्वातंत्र्याचा पुरस्कार होऊन एकाच प्रदेशात, एकाच वस्तीत इतकेच नव्हे तर एकाच घरात हिंदु व बौद्ध हे दोन्ही धर्म भरभराटीने नांदण्याचे हेच कारण आहे कृष्णा नदीच्या खोऱ्यातील प्रदेश जेव्हा वैभवाच्या शिखरावर होता आणि नागार्जुनकोंडा हे विद्येचे माहेरघर होते, तेव्हा बहुतेक पुरुष, ब्राह्मणधर्मीय होते तर स्त्रिया बौद्ध धर्माचे निष्ठापूर्वक पालन करीत होत्या, हे आपल्याला आज माहीत आहे. नागार्जुनकोंडा येथील मुख्य चैत्ये आणि इतर बौद्ध स्मारके, सातवाहनांची राजधानी प्रतिष्ठानपूर जवळील श्री पर्वतच्या राण्या आणि इतर स्त्रिया यांच्या प्रोत्साहनामुळे व त्यांनी पैसा गोळा केल्यामुळे बांधली गेली आहेत. मानवाची समावेशकता जर कशाने स्पष्ट होत असेल तर ती यासारख्या सत्यांनी व कोणत्याही देशाचा इतिहास व परंपरा जर कशाने चित्ताकर्षक व समृद्ध होत असेल तर ती प्रेमाच्या व सहिष्णुतेच्या भावनेने

सेंट टॉमस दिन साजरा करण्याचा उत्साह दरवर्षी वाढतो आहे याचा मला आनंद होतो हा ख्रिश्चन लोकांचा पवित्र दिवस आहे, यात शंका नाही. परंतु इतरांना तो तितकाच पवित्र आहे. कारण निरनिराळ्या धर्मांचा व संस्कृतीचा संगम भारतात व्हावा अशी विधात्याची इच्छा आहे. अनेक संस्कृतीचा आणि अनेक धर्मांचा येथे संगम होऊन त्यांचा समन्वय झाला याला इतिहास साक्ष आहे. आपण भूतकाळ विसरून वर्तमानकाळाचा विचार केला तरी भारतीय जीवनात, निरनिराळ्या संस्कृतींचे व धर्मांचे तेच मनोहारी मिश्रण झाले असल्याचे आपल्या दृष्टीस पडेल ते आपण सर्वांत बहुमोल भांडार समजतो. आधुनिक भारताच्या राष्ट्रपित्याने हे तत्त्व आपल्या मनावर बिंबविले आहे आणि भारतीय राज्यघटनेने प्रत्येकाला धार्मिक स्वातंत्र्य देऊनच ते अंगमूत केले आहे. आपण आपापल्या धर्माशी एकनिष्ठ राहू या परंतु त्यातून अलिप्ततेच्या किंवा वैमनस्याच्या भावनेऐवजी परस्परांविषयी सद्भाव, प्रेम व सहिष्णुता या वृत्ती प्रसृत होऊ द्या सेंट टॉमसने भारतीय भूमीवर पाऊल टाकले तो हा आजचा दिवस साजरा करताना हाच एक विचार माझ्या मनात येतो. आपल्या इतिहासात हा घरोघर फार मोठा दिवस आहे आपल्या देशात एका महान धर्माचे आगमन झालेला हा दिवस आहे आणि ज्या प्रकारे लोकांनी त्याचा स्वीकार केला तो रीत म्हणजे या प्राचीन भूमीतील त्यागात, ज्या धर्मांना धार्मिक भूमीचा नेहमी पाठपुरावा केला आहे त्या वृत्तीचे प्रतीक आहे

आणि मुसलमान धर्माचा आणि त्याच्या पारंपरिक व ऐतिहासिक पार्श्वभूमीचा पूर्ण परिचय करून घेतला होता. यावरून त्याच्या दूरदृष्टीचा व सर्वसंग्राहकतेचा परिचय होतो. फारसी आणि अरबी याच्याखेरीज त्याने संस्कृतचा व हिंदु धर्माच्या काही धर्मग्रंथाचाही अभ्यास केला होता. या दोन समाजाच्या भाषा वेगवेगळ्या आहेत त्यामुळे त्याच्यात सामाजिक संबंध प्रस्थापित होण्यामध्ये अडचणी निर्माण होतात व म्हणून हे समाज एकमेकांपासून दूर राहतात, असे त्याला दिसून आले. या अडचणीचे निवारण करण्याकरिता त्याने निरनिराळ्या बोली व भाषा यांचे प्रयोग करावयास सुरुवात केली. विचार व्यक्त करावयाचे एक सामाईक माध्यम शोधून काढणे हा त्यामागील हेतू होता. दिल्लीमध्ये व आसपास सर्वसामान्य लोकांना समजल्या जाणाऱ्या भाषेत तो लिहू लागला. खुस्रोच्या प्रयत्नाला अपूर्व यश लाभले. सातशेपेक्षा जास्त वर्षांपूर्वी त्याने ज्या भाषेत आपले लिखाण केले त्या भाषेने आधुनिक हिंदी आणि उर्दू याचा पाया घातला असे म्हणता येईल.

आपल्याला येथे हिंदी-उर्दूच्या वादात शिरायचे कारण नाही. किंवा त्यांची उत्क्रांती कशी होत गेली हेही पहायची गरज नाही खुस्रोचे लिखाण हे आधुनिक हिंदुस्थानी किंवा उर्दू किंवा हिंदी याचा बहुधा सर्वात अगोदरचा नमुना आहे हा मुद्दा वादातीत आहे सामान्यपणे परिचित असलेल्या फारशी व संस्कृतमधील शब्दांचा त्याने एक शब्दकोश तयार केला आणि स्थानिक बोलभाषेत त्याने या शब्दाचा उपयोग करायला सुरुवात केली. त्याची लेखनशैली ही आजच्या हिंदी आणि उर्दूची जननी संबोधिली जाते. भारत आणि भारतीय वाङ्मय याना अमीर खुस्रो यानं दिलेली ही सर्वात मोठी देणगी आहे

काहीजण भाषा आणि वाङ्मयीन क्षेत्रात केलेल्या कार्यापेक्षा सामाजिक क्षेत्रात त्याने केलेल्या कार्याला कदाचित जास्त महत्त्व देतील. भारताच्या समिश्र संस्कृतीचा उदय व्हायला अमीर खुस्रोचे प्रयत्न कारणीभूत झाले असे आढळून येईल. भारतात स्थायिक झालेल्या मुसलमान लोकांची राहणी आणि धर्म याविषयी त्याने विस्तारपूर्वक लिहिले आहे त्याचप्रमाणे मुसलमानांच्या हितासाठी त्याने हिंदूंचे पारंपारिक विचार आणि राहणी याविषयीही लिहिले आहे यामुळे या दोन समाजामधील दुरावा कमी होऊ लागला परस्पराविषयी सद्भाव आणि सहानुभूती यामुळे हिंदु आणि मुसलमान याचे सामाजिक संबंध वाढू लागले आणि हे दोन समाज एकमेकाच्या अधिकाधिक जवळ येऊ लागले अमीर खुस्रो, व सुफी पंथाचे मलुक यांच्या शिकवणीमुळे पंधराव्या शतकात व त्यानंतर दिल्लीच्या सलतनतीचा पाया व राज्यकारभाराचा सर्वच स्वरूप अधिक व्यापक झाले, याला इतिहास साक्ष आहे यामुळे खुस्रोच्या चाहत्यांमध्ये हिंदु आणि मुसलमान दोन्ही आहेत याचे आश्चर्य वाटावयास नको

अमीर खुस्रोचा उदय सर्वानुपूर्वी होत असला तरी चालू युगात तो करण्याची त्याला कारणे आहेत असे मला वाटते. भारत हा आता एक स्वतंत्र देश आहे. घटनेप्रमाणे प्रत्येक नागरिकाला समान हक्क प्राप्त झालेले आहेत. धर्म, पंथ किंवा

जाति यामुळे कोणालाही स्वत.ला उच्च किंवा दुसऱ्याला नीच समजता येणार नाही. घटना आणि कायदा यांच्या दृष्टीने सर्व नागरिक समान आहेत. हजारो वर्षांपासून निरनिराळ्या धर्मांचे पालन करणारे लोक येथे राहात आहेत याचा आम्हा भारतीयाना अभिमान वाटेल. आजसुद्धा ज्याचे अनुयायी लहान अथवा मोठया संख्येने आपल्या देशात नाहीत असा धर्म क्वचितच असेल. या सांस्कृतिक विविधतेचा आम्हाला अभिमान वाटतो आणि ते एक वरदान आहे असे आम्ही समजतो.

परंतु केवळ असे बोलणे पुरेसे नाही. या विविधतेचा अभिमान वाटायला हवा असेल आणि तिला वरदान समजायचे असेल तर ती खरोखरच तशी ठरावी यासाठी आपण काही तरी केले पाहिजे. आपण एकमेकांविषयी सदिच्छा आणि सहिष्णुता बाळगली पाहिजे या देशात राहणाऱ्या सर्व धर्मांच्या लोकांना त्याना येथे राहण्याचा आणि त्यांच्या इच्छेप्रमाणे कोणत्याही धर्माचे पालन करण्याचा समान हक्क आहे, असे वाटले पाहिजे हे आपल्या घटनेतील महत्त्वाच्या मूलभूत तत्त्वांपैकी एक आहे आणि औदार्य आणि सहिष्णुता बाळगणे हे प्रत्येक नागरिकाचे कर्तव्य आहे.

हे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी अमीर खुस्रोचा उरूस साजरा करणे किंवा त्याच्यासारख्या थोर पुरुषांनी केलेल्या कार्याचा गौरव करणे यापेक्षा जास्त महत्त्वाची दुसरी कोणतीही गोष्ट नाही देवावर आणि धर्मावर श्रद्धा ठेवणे आणि सर्व प्राणिमात्राविषयी सहानुभूती बाळगणे या दोन्ही गोष्टी एकच आहेत. हजरत निजामुद्दीन व अमीर खुस्रो यांच्यासारख्या थोर पुरुषांच्या जीवनावरून जर कोणती गोष्ट ठळकपणे दृष्टोत्पत्तीस येत असेल तरी ती हीच.

## हिंदी कधीही कोणावरही लादली जाणार नाही

हिंदीचा भारताची सरकारी भाषा म्हणून स्वीकार करण्याच्या फार अगोदरपासून हैदराबाद हे हिंदीच्या प्रचारासाठी अत्यंत अनुकूल क्षेत्र आहे, असे मानले गेले होते सर्वसामान्यपणे ज्याला दख्खन म्हटले जाते तो हैदराबाद आणि त्याच्या परिसरातील भाग ही जणू भाषाशास्त्राची प्रयोगशाळाच होती. सुमारे 500 वर्षांपूर्वी जेव्हा मुसलमान राजांनी तेथे राज्ये स्थापन करून वस्ती केली तेव्हा त्याच्याबरोबरच फारसी आणि उत्तर भारतीय भाषा तेथे गेल्या. उत्तरेकडील आणि दक्षिणेकडील भाषांच्या मिश्रणामुळे हिंदु आणि मुसलमान या दोघांना समजणाऱ्या व उपयोगात आणल्या जाणाऱ्या एका सामाईक भाषेची उत्क्रांती व्हायला मदत झाली आपण हिंदी व ऊर्दू यांच्याकडे मूलत एकच भाषा म्हणून पाहू या. भाषेला कोणतेही नाव दिले तरी दक्षिणी लेखकांनी आणि आश्रयदात्यांनी तिच्या उत्कर्षास फार मोठे साहाय्य केले आहे. सर्व हिंदी भाषी लोक हैदराबाद व दख्खनचे ऋणी आहेत, असे म्हणण्यात अतिशयोक्ती होणार नाही.

3 ऑगस्ट, 1960 रोजी हैदराबाद हिंदी प्रचार सभेच्या पदवीदान प्रसंगी केलेल्या भाषणातील उतारा.

हिंदीविषयी आणि देशात तिचा प्रचार करण्याविषयी बोलताना, काही अहिंदी बांधवांना जी भीती वाटते तिचे निवारण करण्यासाठी मला चार शब्द सांगावेसे वाटतें. मातृभाषेला आपल्या जीवनात किती महत्त्वाचे स्थान आहे याची मला पूर्ण जाणीव आहे. जेव्हा एखाद्या प्रदेशात एखाद्या भाषेचा प्रचार करण्याची आवश्यकता आहे, असे आपण म्हणतो तेव्हा असे केल्याने त्या भागातील भाषेवर अनिष्ट परिणाम. होण्याची शक्यता आहे का व त्या भागातील लोकांच्या जीवनात त्या भाषेला जे स्थान आहे तें सुरक्षित राखण्यासाठी शक्य ते सर्व उपाय योजण्यात आले आहेत काय असा प्रश्न आपण स्वत ला विचारायला पाहिजे. या बाबतीत, अहिंदीभाषी भागातील लोकांना कसलीही भीती वाटत असेल असे मला वाटत नाही आपल्या घटनेप्रमाणे सर्व प्रादेशिक भाषांचे पूर्ण रक्षण करण्यात आलेले असून, राज्यातील दैनंदिन कारभारात त्यांचा अधिकाधिक उपयोग करता यावा या दृष्टीने त्यांचा विकास करून त्यांना प्रोत्साहन देण्यासाठी शक्य ते सर्व उपाय योजण्याचा अधिकार राज्य सरकारांना देण्यात आला आहे.

दुसरा प्रश्न म्हणजे, देशाच्या हितासाठी काही विवक्षित अ० भा० कार्यासाठी ज्या भाषेचा उपयोग करण्यात यावा असे देशाच्या प्रतिनिधींनी ठरविले आहे त्या भाषेचा अभ्यास करणे. जेथे लोकांची मातृभाषा हिंदी नाही असे काही महत्वाचे भाग आपल्या देशात आहेत हे मला माहित आहे म्हणून या भागातील लोकांना हिंदी शिकण्याच्या बाबतीत काही अडचण भासू शकते इंग्रजीऐवजी हिंदीचा उपयोग करण्याबाबतचा कार्यक्रम आखताना ही अडचण लक्षात घेतली आहे. जेव्हा जेव्हा भाषाविषयक धोरणाचा आढावा घेतला जाईल किंवा त्याची चर्चा केली जाईल तेव्हा तेव्हा हिंदीतर भागातील लोकांच्या अडचणींकडे दुर्लक्ष केले जाणार नाही याबद्दल मला पूर्ण खात्री आहे. आपल्या पंतप्रधानांनी लोकसभेत व जाहीर भाषणात अनेक वेळा सांगितले आहे की हिंदी कधीही कोणावरही लादली जाणार नाही. सरकारी भाषा मंडळाच्या शिफारशी व संसदीय समितिने व्यक्त केलेली मतें आणि या शिफारशीप्रमाणे सरकारने केलेले निर्णय याच्या संदर्भात, ही भूमिका वारंवार स्पष्ट करण्यात आली आहे. अवघ्या दोनच दिवसापूर्वी आपल्या गृहमंत्र्यांनी लोकसभेत या भूमिकेचा पुनरुच्चार केला

एक स्वतंत्र व स्वाभिमानी देशाचे नागरिक या नात्याने आपले कर्तव्य काय आहे, याचा अहिंदी भाषी लोकांनी विचार करावा अशी माझी विनंती आहे. देशाच्या ऐक्यासाठी व भविष्यकाळात ते अभंग राहण्यासाठी योजण्यात आलेला उपाय, तो अमलात आणणें आपल्यातील काही लोकांना सोपे जाईल केवळ याच कारणास्तव अयोग्य ठरू शकत नाही. अखिल भारतीय दृष्टिकोनातून आपल्याला या प्रश्नाचा विचार करायचा आहे. अर्थात याच उपायामुळे कोणाच्या बाबतीत पक्षपात होईल किंवा काही लोकांसमोर अडचणी निर्माण

होतील अशी भीती जर वाटत असेल तर तिचे निवारण करता येईल व ते केले पाहिजे. आपल्या देशाच्या भवितव्यावरील आपली श्रद्धा, आपला सद्भाव व आपली निष्ठा यांच्या जोरावर आपण भाषाविषयक व इतर अडचणींवर मात करू शकू अशी मला खात्री वाटते.

या प्रसंगी मी हिंदी भाषेविषयी चार शब्द बोलली तर ते अप्रस्तुत ठरणार नाही. हिंदीला आजचे स्वरूप कसे प्राप्त झाले हे सांगणे भाषाशास्त्रज्ञांचे काम आहे. परंतु मी हिंदी भाषेच्या इतिहासाचा व उत्क्रांतीचा अभ्यास करीत असताना माझी अशी खात्री पटत गेली की 14 व्या व पंधराव्या शतकात जेव्हा हिंदीचे रूपांतर बोलीतून भाषेत होत होते तेव्हा दक्षिण भारतातील साधुसंतांनी व भिक्षूंनी तिच्या विकासासाठी जे कार्य केले ते अत्यंत महत्त्वपूर्ण आहे. राम व कृष्ण यांच्याविषयी भक्तिभाव निर्माण करण्यासाठी साधुसंतांनी जे कार्य केले त्याने हिंदीच्या विकासाला किती मोलाचा हातभार लावला व त्याच्या भक्तिसंप्रदायाचा प्रचार दक्षिणेतून उत्तरेकडे झाला हे कोणाला माहित नाही? रामभक्तीच्या चळवळीचे लोण श्री रामानुजांनी काशीला पोचविले व नंतर स्वामी रामानंदांनी तिचा प्रसार केला. संस्कृतखेरीज प्रादेशिक भाषामध्ये भक्तिसंप्रदायाचा प्रसार जर कोणाच्या प्रेरणेमुळे झाला असेल तर तो त्याच्या प्रेरणेमुळे. अशा रीतीने एके काळी केवळ बोलभाषा म्हणून असलेल्या अवधीत साहित्यनिर्मिती होऊ लागली. वल्लभाचार्य व त्याचे अनुयायी यांनी मथुरेत कृष्णभक्तीचा प्रसार केला. व व्रजभाषेच्या विकासाला बहुमोल हातभार लावला. कृष्णभक्तीच्या चळवळीचा प्रभाव बंगाली भाषेवरही पुष्कळ पडला. भक्तिसंप्रदायाचा प्रसार करणे हे दक्षिण भारतातील साधुसंतांचे मुख्य उद्दिष्ट होते असे जरी असले तरी त्यांनी हिंदीच्या विकासात किती महत्त्वाची भूमिका बजावली आहे, याची आपल्याला यावरून कल्पना येते

## तुमच्याजवळची शक्ती

आपल्या दोन बाजूच्या दोन विभागांना आपण मुकलो आहोत हे दोन विभाग मिळून पाकिस्तान अस्तित्वात आले आहे परंतु आता जो उरलेला भाग आहे तितका मोठा भाग एकाच राजकीय छत्राखाली यापूर्वी कधीही नव्हता. हा देश अधिक संघटित व समृद्धसपन्न करणे हे आपले सर्वांचे कर्तव्य आहे हा विशाल देश, हा आपला थोर वारसा असून, ज्यामुळे त्याचा एक भाग दुसऱ्या भागापासून दूर जाईल अशा कोणत्याही गोष्टीला आपण थारा देता कामा नये. आपण जी घटना तयार केली आहे ती कोणत्याही एका गटाच्या लोकांनी तयार केलेली नाही तर देशाच्या कानाकोपऱ्यातील प्रतिनिधींनी मिळून ती तयार केली आहे. या घटनेप्रमाणे, देशातील सर्व राज्यांना काही अधिकार देण्यात आले आहेत ते केंद्र सरकारलाही काढून घेता येणार नाहीत प्रत्येक राज्याला, त्याच्या

10 ऑगस्ट, 1960 रोजी कोईमतूर येथे नागरिकांच्या सभेत केलेल्या भाषणा-
चा उतारा.

लोकांचे जास्तीत जास्त हित होईल अशा प्रकारे राज्यकारभार चालविण्याचा हक्क घटनेने दिला आहे. एकीकडे राज्याना हो स्वायत्तता दिली आहे. तसेच दुसरीकडे, संपूर्ण प्रजासत्ताक टिकवण्याला व त्याला पाठिंबा द्यायला सदैव तयार राहण्याची जबाबदारी त्यांच्यावर टाकण्यात आली आहे जे विषय केंद्र सरकारच्या अधिकारकक्षेत येत नाहीत त्यांच्या बाबतीत केंद्र सरकारला आपली मते घटनेनुसार कोणत्याही राज्य सरकारवर लादता येत नाहीत. त्याचबरोबर राज्याच्या हितासाठी घटनेप्रमाणे केंद्र सरकारने जे जे करायला हवे ते ते करण्याचे बंधन, केंद्र सरकारवर घालण्यात आले आहे. एखाद्या भागातील दुर्दैवी घटनामुळे आपल्या मनात संभ्रम निर्माण होणे स्वाभाविक आहे आपले मतभेद कोणतेही असोत आपण एकाच देशाचे, एकाच राष्ट्राचे घटक आहोत याची खूणगाठ आपण मनाशी बाळगू या

नागरिक या नात्याने तुम्हाला जे प्रशासकीय उपाय मान्य नसतील ते बदलून घेण्याचा अधिकार तुम्हाला आहे. राज्य तसेच केंद्र या दोन्ही सरकारांच्या बाबतीत तुम्हाला हा अधिकार आहे राज्य सरकार व केंद्र सरकार या दोहो-मध्ये तुम्ही निवडलेले लोक आहेत. त्याना निवडून देऊन तुम्ही त्यांच्यावर विश्वास टाकला आहे व देशाच्या हिताच्या दृष्टीने जे योग्य आहे असे त्याना वाटते ते कार्य ते करीत आहेत. म्हणून तुमचे सामर्थ्य किती आहे, तुमच्या हातात किती शक्ती आहे याची तुम्हाला जाणीव असली पाहिजे. या शक्तीचा उपयोग सावधगिरीने व स्वतःवरील जबाबदारीची पूर्ण जाणीव ठेवून केला पाहिजे.

काही ठिकाणी लोकामध्ये जी प्रवृत्ती निर्माण झाली आहे ती योग्य नाही असे मला वाटते म्हणून मी या विषयाचा इतका ऊहापोह केला आहे घटनेप्रमाणे, कोणत्याही राज्याला किंवा केंद्राला देशात कोणत्याही प्रकारचा साम्राज्य-वाद निर्माण करता येणार नाही ज्या लोकानी साम्राज्यशाहीशी लढा दिला ते स्वतःच साम्राज्यवाद स्थापन करण्याचा संभव नाही हे तुम्ही ओळखले पाहिजे. हा देश एक आहे, अविभाज्य आहे याची जाणीव तुम्ही बाळगावी अशी माझी विनती आहे

मी आज सकाळी येथे आलो त्यानतर मी रामकृष्ण मिशन चालवीत अस-लेल्या दोन सस्थाना भेट दिली या देशाच्या एका कोपऱ्यापासून दुसऱ्या कोप-ऱ्यातील लोकाना जर कोणी एकत्र ठेवले असेल तर ते श्री रामकृष्ण यांच्या-सारख्या सत्पुरुषानी उत्तरेत शकराचार्यांचे मठ पाहताना जितका आनद होतो तितकाच आनद येथील रामकृष्ण मिशनचे कार्य पाहताना होतो तुम्ही आम्हा उत्तर भारतीयाना केवळ शकराचार्यच नव्हे तर रामानुजाचार्य, रामानद व-वल्लभाचार्य दिले आहेत त्यांच्यासारख्या सत्पुरुषाच्या शिकवणीनेच व जीवना-नेच अनेक शतके आपल्याला एकत्र ठेवले या थोर वारसात आता राजकीय ऐक्याची भर पडली आहे. हे ऐक्य चिरकाल ठेवणे हे आपले आद्य कर्तव्य आहे.

स्थापन केली. ज्या संकुचित प्रवृत्तीमुळे आपल्या देशाला अनेक वेळा परक्यांचे वर्चस्व सहन करावे लागले त्या प्रवृत्तीपासून आपण आपले रक्षण केले पाहिजे. आपण संपूर्ण देशावर प्रेम करायला शिकू या. देशाच्या कोणत्याही भागावर आघात झाला किंवा हानी झाली तरी ती संपूर्ण देशाची हानी झाली असे आपण समजले पाहिजे. आज संपूर्ण देश एकाच प्रशासकीय नियंत्रणाखाली असल्यामुळे आवश्यकता भासल्यास, संपूर्ण देशाच्या हितासाठी आपल्या वैयक्तिक किंवा गटाच्या हिताचा त्याग करायला आपण सिद्ध असले पाहिजे. हे कर्तव्य आपण ओळखले तरच आपला राज्यकारभार स्वतःच चालवायला आपण लायक आहोत, हे सिद्ध होईल.

## लोकशाही

आपल्यामध्ये अनेक प्रकारचे मतभेद होते. आपल्यात धार्मिक मतभेद होते भाषिक मतभेद होते आपली राहणी, पोषाख, चालीरीती इतकेच काय पण आपले अन्न याबाबतीतही आपल्यात भिन्नता होती. परंतु या सर्व प्रकारच्या विभिन्नतेतही सर्वांना जोडणारे बंधन होते आज यात राजकीय ऐक्याची भर पडली आहे अशा वेळी इतिहास काय धडा शिकवितो याकडे दुर्लक्ष करून आपण आपल्यात फूट पडू दिली तर आपण खरोखरच अत्यंत दुर्दैवी ठरू. लहानसहान प्रश्नांच्या बाबतीतही, कोणत्याही स्वरूपात जाहीर निदर्शन करून, आपली मते व्यक्त करायची सवय आपल्याला लागली आहे म्हणून मी हे सांगत आहे आता आपल्याला लोकशाही घटना लाभल्यामुळे सनदशीर मार्गांनी चळवळ करणे किंवा सनदशीरपणे आपली मते व्यक्त करणे, याखेरीज अन्य कोणत्याही मार्गाचा आपण अवलंब करण्याची आवश्यकता नाही देशाला आपली मते व्यक्त करण्याची संधी दर 4–5 वर्षांनी मिळते त्याची तशी इच्छा असल्यास या मुदतीच्या अगोदरही त्याला आपले विचार व्यक्त करता येतात. अशा प्रकारे आपण सरकार व लोक यांच्यात संपर्क साधू शकतो सर्व सनदशीर कार्यपद्धतीच्या यंत्रणेच्या मुळाशी हीच गोष्ट आहे. कोणत्याही कार्यक्रमाची चाचणी करायची झाल्यास निदान 3–4 वर्षे तरी लागतात कोणत्याही मंत्रीमंडळाला त्याचा कार्यक्रम प्रत्यक्षात उतरवायला निदान एवढा कालावधी लागतोच या कार्यक्रमाला लोकांची मान्यता अगोदरच मिळालेली असते हे लक्षात ठेवले पाहिजे. जर कोणत्याही कारणामुळे हे धोरण चुकीचे असल्याचे किंवा त्याच्या अमलबजावणीचा काही परिणाम न झाल्याचे आढळले तर सरकार अन्य लोकांकडे किंवा अन्य कोणत्या पक्षाकडे सोपविण्याची लोकांना पूर्ण मोकळीक आहे आपली घटना लवचिक आहे सर्व प्रकारचे मतभेद व्यक्त करायला ती मोकळीक देते सनदशीर कार्यपद्धती व सनदशीर मार्ग याखेरीज अन्य कोणत्याही मार्गाचा आपण विचार करण्याची गरज नाही

---

बेल्लोर येथे 12 ऑगस्ट 1960 रोजी वकील सभासमोर केलेले भाषण.

## आपण संघटित असले पाहिजे

संसदेतील सभासदांखेरीज कायदेमंडळाच्या सभासदांसमोर मी क्वचितच भाषण करतो. घटनेप्रमाणे, मला त्यांच्यासमोर दरवर्षी निदान एकदा भाषण करावे लागते. व ते मी करतो. परंतु माझे भाषण हे केवळ नावापुरतेच माझे असते. संसदेच्या सभासदांसमोर दिल्लीमध्ये सुद्धा भाषण करण्याची मला अन्य कोणतीही संधी मिळत नाही हे तुम्हाला माहीत आहेच. म्हणून, आजच्या घटकेला मला ज्या गोष्टी अत्यंत महत्त्वाच्या वाटतात त्यांच्यावर भाषण करण्याची नव्हे तर मोकळेपणाने माझे विचार मांडायची तुम्ही मला संधी दिल्याबद्दल मी तुमचा आभारी आहे.

आपल्याला स्वातंत्र्य मिळून फक्त 13 वर्षे झाली आहेत यानंतर 3 वर्षांनी आपण भारत प्रजासत्ताक झाल्याचे जाहीर केले त्या 2–3 वर्षांत आपल्याला घटना तयार करता आली. ती संपूर्ण देशाला लागू करण्यात आली आहे. ब्रिटिश हा देश सोडून गेले तेव्हा तो बऱ्याच विभक्त अवस्थेत होता. पाकिस्तानच्या निर्मितीमुळे देशाचे विभाजन झाले. या मोठ्या प्रश्नाखेरीज आपल्यासमोर आणखी एक प्रश्न होता व तो म्हणजे देशात असलेली 500 पेक्षा जास्त संस्थाने. बहुतेक संस्थानिकांनी स्वातंत्र्यापूर्वी भारतात विलीन होण्याचे ठरविले होते व जी एक दोन संस्थाने त्या वेळी बाहेर राहिली होती ती सुद्धा नंतर भारतात विलीन झाली हे लक्षात ठेवले पाहिजे. याचा परिणाम असा झाला की देशाचा जो भाग पूर्वी ब्रिटिशांच्या राजवटीखाली होता केवळ तेवढ्याच भागाला नव्हे तर भारतीय संस्थानिकांच्या अंमलाखाली असलेल्या भागालाही लागू करता येईल अशी राज्यघटना आपल्याला तयार करता आली. राज्यघटना तयार केल्यानंतर आपण आपल्या देशाची विभागणी राज्यात केली. या राज्यांच्या सरहद्दीत नंतर बदल करण्यात आले. आपण सर्वस्वी पूर्वीच्या एखाद्या संस्थानाचे उत्तराधिकारी आहोत असे कोणत्याही राज्याला आज म्हणता येईल असे मला वाटत नाही. ही संस्थाने मोडून निरनिराळ्या राज्यांना जोडण्यात आली किंवा इतर राज्यांचे काही भाग त्यांनी स्वतःला जोडून घेतले अशा प्रकारे आपण संपूर्ण देश एकाच घटनेच्या एकाच राजवटीच्या अंमलाखाली आणू शकलो. संपूर्ण देशासाठी कायदे करणारे आता एक पार्लमेंट आहे कित्येक विषयांच्या बाबतीत संपूर्ण देशावर अधिकार असणारे एकच केंद्र सरकार आहे अर्थात राज्ये अनेक बाबतीत स्वायत्त आहेत काही अत्यंत महत्त्वाच्या विषयांच्या बाबतीत केवळ त्यानाच सर्व अधिकार आहे परंतु एकंदरीने संपूर्ण देशाला एकच घटक मानून आता त्याचा कारभार चालविला जातो त्याला तुम्ही केंद्रसत्ताक राज्य अथवा केंद्रसत्ताक संयुक्त राज्य अथवा संयुक्त केंद्रसत्ताक राज्य किंवा अन्य काही म्हणा. या देशाच्या कोणत्याही राजाने यापूर्वी जी गोष्ट कधीही प्राप्त केली नव्हती ती

---

13 ऑगस्ट, 1960 रोजी मद्रास येथे मद्रास कायदेमंडळातील सभासदांसमोर केलेले भाषण.

आपण संपादन केली आहे. आपल्या देशाचा बराच मोठा भाग ज्यांच्या अमलाखाली होता असे अशोकसारखे सम्राट होऊन गेले. मोगल सम्राटही होऊन गेले. परंतु आपले राज्य संपूर्ण देशभर होते असे त्यांच्यापैकी कोणालाही म्हणता आले नसते. आपल्या देशात लहान लहान राजे होते. ते या सम्राटांचे मांडलिक म्हणून राहात असत व खंडणी देऊन किंवा अन्य प्रकारे ते आपले मांडलिकत्व व्यक्त करीत असत. बहुतेक राजे जी खंडणी देत असत ती केवळ नाममात्रच असे. हिंदु चालीरीतीप्रमाणे ज्याची आज्ञा संपूर्ण देशात अविरोध पाळली जात असे त्याला चक्रवर्ती म्हणत असत. त्याचे चक्र अविरोध संपूर्ण देशात जाऊ शकत असे. मोगल सम्राटाचेही सुभे होते व तेथे सुभेदाराचा जवळ जवळ अनियंत्रित अंमल होता. त्याचे मांडलिकत्व केवळ नाममात्र होते.

आज प्रथमच आपल्याला राजकीय ऐक्य लाभले आहे. अर्थात, हिमालयापासून कन्याकुमारीपर्यन्त भौगोलिकदृष्ट्या एक असलेला भारत हा एक पृथक् देश असल्याचे मान्य करणारा इतिहास आपल्याला आहे. या भौगोलिक प्रदेशात वेगवेगळी राज्ये असली तरी तो एक अविभाज्य देशच मानला गेला आहे व सांस्कृतिक व धार्मिक दृष्टीनेही तो एकच देश राहिलेला आहे. नंतर इतर धर्माचा प्रवेश झाला तेव्हा सुद्धा सपूर्ण देश एक घटक म्हणूनच राहिला. परंतु राजकीय दृष्ट्या या ऐक्याच्या भरीला राजकीय व प्रशासकीय ऐक्यही लाभले आहे. म्हणून आपले कार्यक्षेत्र पूर्वी कधीही नव्हते इतके व्यापक आज झाले आहे. आज सधी पुष्कळ अधिक प्रमाणात उपलब्ध झाल्या आहेत. व त्यामुळे जबाबदाऱ्याही पुष्कळ वाढल्या आहेत या ऐक्याला कधीही धोका निर्माण होऊ नये म्हणून ते अधिक दृढ करणे हे आपले कर्तव्य आहे बाहेरून धोके निर्माण होतील तसेच ते आतूनही निर्माण होतील. क्षुल्लक कारणावरून आपल्यातील फुटीर प्रवृत्ती वर उफाळून येतात त्यांना आपण आटोक्यात ठेवले पाहिजे एक गट व दुसरा गट यांच्यामध्ये भेदभाव करणे, ही गोष्ट, त्यामागील कारणाचा व हेतूचा विचार केल्यास, दिसते त्यापेक्षा जास्त गंभीर स्वरूपाची आहे. आपल्याला निराश होण्याचे कारण नसले तरी आपण जागरूक असले पाहिजे. आपण आत्मसंतोषी असता कामा नये. आपण आता स्वातंत्र्य मिळविले असल्यामुळे आपण आता कसेही वागू शकतो असे आपण समजता कामा नये आपल्या आचार-विचारांविषयी व इतरांविषयीच्या आपल्या दृष्टिकोनाविषयी—मग ते आपले शेजारी असोत अथवा आपल्यापासून एकदोन हजार मैल दूर राहणारे असोत—नेहमी अत्यंत सावधगिरी बाळगणे आवश्यक आहे.

पंचवीस वर्षांपूर्वी बिहारमध्ये जो भूकंप झाला होता त्याचा उल्लेख करण्यात आला आहे. देशाच्या एका लहान भागावर ओढवलेली ती एक मोठी आपत्ती होती. परंतु सपूर्ण देशातील लोकांनी जी सहानुभूती व्यक्त केली ती पाहून मला आनंद झाला. देशाच्या कानाकोपऱ्यातून पैसे, धान्य व कपडे यांच्या स्वरूपात मला देणग्या मिळाल्या हे माझे सुदैव त्यामुळे मला दिलासा मिळाला व आपल्याला ऐक्याची जाणीव होऊ लागली आहे असे मला वाटू लागले. कोणतीही घटना आनंदाची असो वा दुःखाची असो, आपण सर्वजण आनं-

## आपण संघटित असले पाहिजे

संसदेतील सभासदांखेरीज कायदेमंडळाच्या सभासदांसमोर मी क्वचित भाषण करतो. घटनेप्रमाणे, मला त्याच्यासमोर दरवर्षी निदान एकदा भाषण करावे लागते. व ते मी करतो. परंतु माझे भाषण हे केवळ नावापुरतेच माझे असते. संसदेच्या सभासदासमोर दिल्लीमध्ये सुद्धा भाषण करण्याची मला अन्य कोणतीही संधी मिळत नाही हे तुम्हाला माहीत आहेच. म्हणून, आजच्या घटकेला मला ज्या गोष्टी अत्यंत महत्त्वाच्या वाटतात त्याच्यावर भाषण करण्याची नव्हे तर मोकळेपणाने माझे विचार मांडायची तुम्ही मला संधी दिल्याबद्दल मी तुमचा आभारी आहे.

आपल्याला स्वातंत्र्य मिळून फक्त 13 वर्षे झाली आहेत. यानंतर 3 वर्षांनी आपण भारत प्रजासत्ताक झाल्याचे जाहीर केले. त्या 2–3 वर्षांत आपल्याला घटना तयार करता आली. ती संपूर्ण देशाला लागू करण्यात आली आहे. ब्रिटिश हा देश सोडून गेले तेव्हा तो बऱ्याच विभक्त अवस्थेत होता. पाकिस्तानच्या निर्मितीमुळे देशाचे विभाजन झाले. या मोठ्या प्रश्नाखेरीज आपल्यासमोर आणखी एक प्रश्न होता व तो म्हणजे देशात असलेली 500 पेक्षा जास्त संस्थाने. बहुतेक संस्थानिकांनी स्वातंत्र्यापूर्वी भारतात विलीन होण्याचे ठरविले होते व जी एक दोन संस्थाने त्या वेळी बाहेर राहिली होती ती सुद्धा नंतर भारतात विलीन झाली हे लक्षात ठेवले पाहिजे. याचा परिणाम असा झाला की देशाचा जो भाग पूर्वी ब्रिटिशांच्या राजवटीखाली होता केवळ तेवढ्याच भागाला नव्हे तर भारतीय संस्थानिकांच्या अंमलाखाली असलेल्या भागालाही लागू करता येईल अशी राज्यघटना आपल्याला तयार करता आली. राज्यघटना तयार केल्यानंतर आपण आपल्या देशाची विभागणी राज्यात केली. या राज्यांच्या सरहद्दीत नंतर बदल करण्यात आले. आपण सर्वस्वी पूर्वीच्या एखाद्या संस्थानाचे उत्तराधिकारी आहोत असे कोणत्याही राज्याला आज म्हणता येईल असे मला वाटत नाही ही संस्थाने मोडून निरनिराळ्या राज्यांना जोडण्यात आली किंवा इतर राज्यांचे काही भाग त्यांनी स्वतःला जोडून घेतले. अशा प्रकारे आपण संपूर्ण देश एकाच घटनेच्या एकाच राजवटीच्या अमलाखाली आणू शकलो. संपूर्ण देशासाठी कायदे करणारे आता एक पार्लमेंट आहे प्रत्येक विषयाच्या बाबतीत संपूर्ण देशावर अधिकार असणारे एकच केंद्र सरकार आहे. अर्थात राज्ये अनेक बाबतीत स्वायत्त आहेत. काही अत्यंत महत्त्वाच्या विषयांच्या बाबतीत केवळ त्यानाच संपूर्ण अधिकार आहे परंतु एकंदरीने संपूर्ण देशाला एकच घटक मानून आता त्याचा कारभार चालविला जातो. त्याला तुम्ही केंद्रसत्ताक राज्य अथवा केंद्रसत्ताक संयुक्त राज्य अथवा संयुक्त केंद्रसत्ताक राज्य किंवा अन्य काही म्हणा. या देशाच्या कोणत्याही राजाने यापूर्वी जी गोष्ट कधीही प्राप्त केली नव्हती ती

13 ऑगस्ट, 1960 रोजी मद्रास येथे मद्रास कायदेमंडळातील सभासदांसमोर केलेले भाषण.

आपण संपादन केली आहे. आपल्या देशाचा बराच मोठा भाग ज्यांच्या अमलाखाली होता असे अशोकमारखे सम्राट होऊन गेले. मोगल सम्राटही होऊन गेले. परंतु आपले राज्य संपूर्ण देशभर होते असे त्यांच्यापैकी कोणाला ही म्हणता आले नसते आपल्या देशात लहान लहान राजे होते. ते या सम्राटांचे मांडलिक म्हणून राहात असत व खंडणी देऊन किंवा अन्य प्रकारे ते आपले मांडलिकत्व व्यक्त करीत असत. बहुतेक राजे जी खंडणी देत असत ती केवळ नाममात्रच असे. हिंदु चालीरीतींप्रमाणे ज्याची आज्ञा संपूर्ण देशात अविरोध पाळली जात असे त्याला चक्रवर्ती म्हणत असत. त्याचे चक्र अविरोध संपूर्ण देशात जाऊ शकत असे. मोगल सम्राटांचेही सुभे होते व तेथे सुभेदारांचा जवळ जवळ अनियंत्रित अंमल होता. त्यांचे मांडलिकत्व केवळ नाममात्र होते.

आज प्रथमच आपल्याला राजकीय ऐक्य लाभले आहे. अर्थात, हिमालया-पासून कन्याकुमारीपर्यंत भौगोलिकदृष्ट्या एक असलेला भारत हा एक पृथक् देश असल्याचे मान्य करणारा इतिहास आपल्याला आहे. या भौगोलिक प्रदेशात वेगवेगळी राज्ये असली तरी तो एक अविभाज्य देशच मानला गेला आहे व सांस्कृतिक व धार्मिक दृष्टीनेही तो एकच देश राहिलेला आहे. नंतर इतर धर्मांचा प्रवेश झाला तेव्हा सुद्धा संपूर्ण देश एक घटक म्हणूनच राहिला. परंतु राजकीय दृष्ट्या या ऐक्याच्या भरीला राजकीय व प्रशासकीय ऐक्यही लाभले आहे. म्हणून आपले कार्यक्षेत्र पूर्वी कधीही नव्हते इतके व्यापक आज झाले आहे. आज संधी पुष्कळ अधिक प्रमाणात उपलब्ध झाल्या आहेत. व त्यामुळे जबाब-दाऱ्याही पुष्कळ वाढल्या आहेत या ऐक्याला कधीही धोका निर्माण होऊ नये म्हणून ते अधिक दृढ करणे हे आपले कर्तव्य आहे बाहेरून धोके निर्माण होतील तसेच ते आतूनही निर्माण होतील क्षुल्लक कारणावरून आपल्यातील फुटीर प्रवृत्ती वर उफाळून येतात त्याना आपण आटोक्यात ठेवले पाहिजे एक गट व दुसरा गट यांच्यामध्ये भेदभाव करणे, ही गोष्ट, त्यामागील कारणाचा व हेतूचा विचार केल्यास, दिसते त्यापेक्षा जास्त गंभीर स्वरूपाची आहे. आपल्याला निराश होण्याचे कारण नसले तरी आपण जागरूक असले पाहिजे. आपण आत्मसंतोषी असता कामा नये आपण आता स्वातंत्र्य मिळविले असल्यामुळे आपण आता कसेही वागू शकतो असे आपण समजता कामा नये. आपल्या आचार-विचारा-विषयी व इतराविषयीच्या आपल्या दृष्टिकोनाविषयी—मग ते आपले शेजारी असोत अथवा आपल्यापासून एकदोन हजार मैल दूर राहणारे असोत—नेहमी अत्यंत सावधगिरी बाळगणे आवश्यक आहे.

पंचवीस वर्षांपूर्वी बिहारमध्ये जो भूकंप झाला होता त्याचा उल्लेख करण्यात आला आहे देशाच्या एका लहान भागावर ओढवलेली ती एक मोठी आपत्ती होती. परन्तु संपूर्ण देशातील लोकांनी जी सहानुभूती व्यक्त केली ती पाहून मला आनंद झाला देशाच्या कानाकोपऱ्यातून पैसे, धान्य व कपडे यांच्या स्वरू-पात मला देणग्या मिळाल्या हे माझे सुदैव. त्यामुळे मला दिलासा मिळाला व आपल्याला ऐक्याची जाणीव होऊ लागली आहे असे मला वाटू लागले. कोण-तीही घटना आनंदाची असो वा दुःखाची असो, आपण सर्वजण आनं-

अथवा दुःखात सहभागी होऊ या. जोपर्यंत संपूर्ण देशाविषयी आपल्या मनात खरेखुरे प्रेम व सहानुभूती निर्माण होत नाही तोपर्यंत आपल्याला अस्वस्थ करणाऱ्या घटना वेळोवेळी घडणारच. आपल्यांत दृढ बंधुभाव व ऐक्यभाव असेल तरच, चुकून, किंवा योगायोगाने अथवा कोणाच्या दुष्कृत्याने देशात कोठेही काही उपद्रव झाल्यास आपण आपली डोकी शांत ठेवू शकू.

आपण विकास योजना पार पाडल्या व या योजना फलद्रूप होऊन संपूर्ण देशाला त्यांचा लाभ होऊ लागेल अशी अपेक्षा आहे. अर्थात प्रत्येक योजनेचा लाभ देशाच्या प्रत्येक कानाकोपऱ्याला झाला आहे असे म्हणता येणार नाही. ते शक्यही नाही. परंतु एका पाठोपाठ एक योजना आखून विकासकार्याचे लोण जास्तीत जास्त दूरवर पोचवायचे व जास्तीत जास्त भागाला लाभ मिळवून द्यायचा असा आपला विचार आहे. या योजनांमुळे आपले राहणीचे मान वाढेल, अशी आपली अपेक्षा आहे. या योजनांच्या बाबतीत निराशावादी राहण्याचे काही कारण नाही. आपल्याला चांगले यश मिळाले आहे. या योजना फलद्रूप होण्यासाठी वेळ लागतो म्हणून अजून आपल्याला पूर्ण लाभ झालेला नाही. अर्थात आपल्या मार्गात अडचणी आहेत. परंतु आपण जो अनुभव प्राप्त करीत आहोत व इतर देशाकडून जे ज्ञान मिळवीत आहोत ते घेऊन आपण प्रगतीपथावर आगेकूच करीत राहू.

भौतिक संपन्नता प्राप्त करून सुद्धा आपल्याला आपल्या लोकाना पूर्ण सुखी करता येणार नाही या मुद्यावर मला भर द्यायचा आहे. केवळ भौतिक संपन्नतेमुळे सुख प्राप्त होत नाही ही गोष्ट आपण केव्हाच शिकलो आहोत. सुख हे सर्व गोष्टींच्या पलीकडे असते आपल्या लोकांना दारिद्र्य व हालअपेष्टा याना तोंड द्यावे लागले. परंतु त्यानी कधीही आशा सोडली नाही. त्यांचा चेहरा नेहमी प्रफुल्ल असे गरीबातल्या गरीब माणसाचा चेहरा सुद्धा हसतमुख असतो कारण आपल्याला जे लाभले आहे त्यात संतोष मानावा असे संस्कार त्याच्यावर झाले असतात. व जोपर्यंत विपदावस्थेत सुद्धा संतुष्ट व आनंदी राहण्याचा गुण आपल्यामध्ये राहील तोपर्यंत आपण अधिकाधिक प्रगती करीत राहू.

अर्थात प्रतिपक्षाचे लोक असे म्हणतील की अशा समाधानी वृत्तीमुळे दारिद्र्य व दुःख निर्माण होते परंतु मला तसे वाटत नाही दुःख दारिद्र्यात असते असे मला वाटत नाही. तर आपल्या जाणीवेत दुःख असते आपण आपल्या प्रयत्नांची पराकाष्ठा केली आहे व जे पडेल त्याला आपण तोंड दिले पाहिजे अशी आपली वृत्ती असल्यास अडचणीत असताना सुद्धा आपण सुखी राहू शकू. याचा अर्थ असा नव्हे की आपण दारिद्र्यात राहावे आपल्याला भौतिक प्रगती करायची आहे परंतु त्याचबरोबर आपण आपल्या मूलभूत धार्मिक व नैतिक नियमांकडे, मग तो धर्म मुसलमान असो, ख्रिश्चन असो अथवा हिंदु असो—दुर्लक्ष करता

कामा नये. हा संदेश लोकांपर्यंत पोचविणे हे आपल्या सर्वांचे विशेषत: जनतेचे प्रतिनिधी या नात्याने तुमचे कर्तव्य आहे.



## राष्ट्रभाषेच्या दिशेने

देशभर भ्रमण करीत असताना, देशाचे बहुतेक भाग मी एकापेक्षा जास्त वेळा पाहिले आहेत. मी ज्या प्रवृत्ती पाहिल्या आहेत त्यावरून आपल्याला आपल्या देशाविषयीचे कर्तव्य पूर्णपणे समजले नाही असे सूचित होते. बहुतेक ठिकाणी प्रांतीयतेचा वरचष्मा असल्याचे मला आढळून येते. तर इतर ठिकाणी जातीयवादाचा वरचष्मा असल्याचे दिसून येते.

आपल्या देशात निरनिराळी राज्ये आहेत, त्यांची स्वत:ची वैशिष्ट्ये आहेत. त्यांचे व्यक्तिमत्व आहे. परंतु त्याबरोबर भारत हे एक राष्ट्र आहे. व ही राज्ये त्या राष्ट्राचे घटक आहेत प्रत्येक राज्याला त्याच्या इच्छेनुसार विकास घडवून आणता येईल अशी तरतूद घटनेत केली आहे. त्याचबरोबर संपूर्ण देशाचा विकास होऊन तो संपन्न व्हावा यासाठी राज्यांनी मिळून प्रयत्न केले पाहिजेत, असेही घटनेत म्हटले आहे. म्हणून प्रत्येक राज्यावर दुहेरी जबाबदारी आहे. एक केंद्र सरकारविषयीची जबाबदारी व दुसरी त्याच्या स्वत:च्या अल्पसंख्य लोकांविषयीची जबाबदारी. या दोन्ही जबाबदाऱ्यांची पूर्ण जाणीव झाली तरच कोणतेही राज्य समृद्ध होऊ शकेल प्रत्येक राज्य, आपल्या भागातील अल्पसंख्य लोकांना कशा प्रकारे वागविते, याचाही अंतर्भाव, या राज्याच्या जबाबदारीमध्ये होतो. काही ठिकाणे अशी आहेत की जेथे जातिवादामुळे अनर्थ होतो व घटनेतील ज्या तरतुदीचा उपयोग सर्वांसाठी करायचा आहे त्याचा उपयोग काही गटातील लोकांसाठी केला जातो गट धार्मिक असू शकतील अथवा जातीय किंवा भाषिक असू शकतील. कोणत्याही राज्यातील बहुसंख्य लोकांच्या भाषेला राज्यकारभारात व शैक्षणिक क्षेत्रात योग्य स्थान प्राप्त झाले पाहिजे यात शंकाच नाही. परंतु राज्यातील भाषिक अल्पसंख्य लोकांना त्या राज्यात सुरक्षितपणा वाटला पाहिजे हेही तितकेच आवश्यक आहे.

अलीकडेच काही अत्यंत दुर्दैवी घटना घडल्या. यासंबंधी मला निश्चित शब्दांत काही सांगता येत नाही कारण मला संपूर्ण सत्यस्थिती माहीत नाही. परंतु या घटनांच्या मुळाशी मुद्दामहून भाषावाद असावा असे मला वाटते. नोकऱ्यांसंबंधीची काही गाऱ्हाणी सुद्धा त्याच्या मुळाशी असू शकतील. म्हणून यापैकी कोणत्याही गोष्टीमुळे कोणालाही त्रास होऊ नये याबद्दल आपण अत्यंत सावधगिरी बाळगली पाहिजे भाषिक अल्पसंख्य लोकांना त्यांच्या मुलांना निदान प्राथमिक शिक्षण मातृभाषेतून देता यावे या दृष्टीने आपल्या घटनेप्रमाणे तसेच प्रशासकीय हुकुमाप्रमाणे या लोकांच्याही भाषेचे रक्षण करण्याची हमी देण्यात

---

महाराष्ट्रमध्ये मरीना बीचवर 15 ऑगस्ट, 1960 रोजी जाहीर सभेत केलेले भाषण.

आली आहे. त्याप्रमाणे नोकऱ्यांमध्ये सुद्धा प्रत्येकाला त्याचा योग्य वाटा मिळावा याची काळजी घतली पाहिजे. परंतु यासंबंधात आपण एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे ती अशी की सरकारी नोकरी हाच चरितार्थाचा एकमेव मार्ग नाही. आपल्या उद्योगधंद्यांचा जसजसा विकास होत जाईल तसतसे सरकारी नोकरीवर अवलंबून राहण्याचे प्रमाण कमी होत जाईल. अशी स्थिती जोपर्यंत येत नाही तोपर्यन्त एखाद्या व्यक्तीवर ती अल्पसंख्य गटातील आहे या कारणास्तव अन्याय होणार नाही अशी खबरदारी घेणे आवश्यक आहे. व एखादी व्यक्ती अल्पसंख्य गटातील आहे म्हणून तिला शैक्षणिक संस्थात प्रवेश मिळण्याच्या बाबतीत अन्याय होतो आहे असेही घडू नये.

हे झाले राज्याच्या, त्याच्या नागरिकांविषयीच्या कर्तव्यासंबंधी. परंतु राज्याचे केंद्रासंबंधीही कर्तव्य आहे. राज्ये व केंद्र याची कर्तव्ये व जबाबदाऱ्या कोणत्या आहेत हे घटनेत नमूद करण्यात आले आहे.

अनेक लोकांची मने भाषेच्या प्रश्नामुळे अस्वस्थ झाली आहेत. म्हणून त्याविषयी मी सविस्तरपणे बोलू इच्छितो. आपण स्वातंत्र्यलढा चालवीत होतो तेव्हा सुद्धा आपल्या देशाच्या भाषेचा प्रश्न आपल्याला सोडवावा लागेल याची महात्मा गांधींना जाणीव होती. आपल्या देशात अनेक भाषा आहेत व प्रत्येक भाषेचा विकास झाला पाहिजे असे आपल्याला वाटले. म्हणून कॉंग्रेसची घटना दुरुस्त करण्यात आली. नागपूर येथे 1920 मध्ये भरलेल्या कॉंग्रेसच्या अधिवेशनात, कॉंग्रेससाठी भाषावार प्रांत निर्माण करण्यात आले. व ज्या प्रांतात एकापेक्षा जास्त भाषा होत्या तेथेही कॉंग्रेसचे पुष्कळ प्रांत होते. तुमच्यापैकी जे वयस्क आहेत त्याना हे माहीत असेलच की या राज्यात सुद्धा, तामीळ भाषा होती, तेलुगु भाषा होती, काही भागात मलयालम भाषा होती तर काही भागात कानडी भाषा होती. राज्यकारभाराच्या दृष्टीने तो एक प्रांत होता. परंतु कॉंग्रेस संघटनेचे त्यात कित्येक प्रांत होते. त्याचप्रमाणे मुंबई इलाख्यात, मराठी, गुजराती तर होतीच परंतु याखेरीज कानडी सुद्धा होती व याही प्रांतात कॉंग्रेसचे पुष्कळ प्रांत होते.

तेव्हा भाषावार प्रांतरचना हा काही आजच्या सरकारचा हट्टदिप्तपणा नाही. भाषावार प्रांतरचनेची कल्पना गांधीजींनी दिली व आजच्या सरकारने कायदा करून ती प्रत्यक्षात उतरविली. सर्व भाषांचा जास्तीत जास्त विकास व्हावा ही त्यामागील कल्पना आहे. घटनेत त्याची तरतूद केली आहे व प्रत्येक प्रांताने आपल्या भाषेचा जास्तीत जास्त विकास करावा अशी आपली इच्छा आहे. आपल्या विद्यापीठांना सुद्धा, आपल्या शिक्षणक्रमात भारतीय भाषांना स्थान दिले पाहिजे याची जाणीव आता होऊ लागली आहे. बऱ्याच विद्यापीठांनी प्रादेशिक भाषा, हे शिक्षणाचे माध्यम म्हणून स्वीकारले आहे व सर्व विद्यापीठांनी अत्युच्च शिक्षणापर्यन्त प्रादेशिक भाषा हे शिक्षणाचे माध्यम अद्याप स्वीकारले नसले तरी आज ना उद्या त्याना ही गोष्ट करावीच लागेल. केवळ शैक्षणिक क्षेत्रातच नव्हे तर प्रशासकीय क्षेत्रातही प्रादेशिक भाषांना त्यांचे स्थान दिले पाहिजे. प्रशासनाच्या

अगदी खालच्या पातळीवर प्रादेशिक भाषाचा उपयोग नेहमीच झाला असून आज वरच्या पातळीवर सुद्धा त्याचा उपयोग होतो आहे. एक दिवस असा येईल की ज्या दिवशी केवळ प्रादेशिक भाषातूनच राज्यांचा राज्यकारभार चालविला जाईल. गांधीजींचा हेतू नेमका हाच होता.

परंतु गांधीजींनी संपूर्ण देशाच्या भाषेचाही विचार केला व स्वाभाविकपणे हिंदी ही ती भाषा होऊ शकेल असे त्याना वाटले. मी 'स्वाभाविकपणे' हा शब्द वापरला आहे. कारण इतर कोणत्याही भाषेपेक्षा ही भाषा बोलणाऱ्यांची संख्या जास्त आहे, हे त्याना दिसत होते. जेव्हा लोक हिंदी साम्राज्यवाद असा शब्दप्रयोग करतात तेव्हा त्यांना काय म्हणावयाचे आहे हे मला कधीकधी समजत नाही. हिंदी ही संपूर्ण भारताची भाषा असावी ही कल्पना, कोणत्याही हिंदीभाषी व्यक्तीने माडली नाही. हिंदीचा अ० भा० भाषा म्हणून प्रचार करण्याचे कार्य उत्तर भारतातील दोघांनी केले आहे. त्याच्यापैकी कोणाचीही मातृभाषा हिंदी नव्हती. गेल्या शतकाच्या उत्तरार्धात, स्वामी दयानंदाना या गोष्टीची जाणीव झाली की त्याना त्याच्या सम्प्रदायाचा प्रसार करायचा असेल तर त्यानी हिंदीचाच उपयोग केला पाहिजे. ते हिंदीभाषी प्रांताचे नव्हते ते काठेवाडचे होते. त्यानंतर सुमारे 50 वर्षांनी गांधीजींनी हेच कार्य हाती घेतले ते सुद्धा हिंदीभाषी प्रांताचे नव्हते. त्याच्या आयुष्याच्या उत्तरार्धात ते अस्खलितपणे हिंदी बोलत असले व जाहीर सभांतून हिंदीतून भाषणे करीत असले तरी जेव्हा ते हिंदी बोलताना अडखळत होते व त्याना नीट बोलता यत नव्हते ते दिवस मला आठवतात. दक्षिण आफ्रिकेत असताना सुद्धा त्याच्या मनात ही कल्पना होती की हिंदी हीच संपूर्ण भारतात, परस्परांशी व्यवहार करण्याची भाषा होऊ शकेल. तेथे सुद्धा त्यांनी तामीळ भाषी लोकासकट इतर लोकासमोर, त्यांच्या मोडक्यातोडक्या हिंदीत भाषण केली. नतर 1917 मध्ये ते चंपारनला आले तेव्हा हिंदीचे थोडेसेच शब्द ते बोलू शकत होते. परंतु ते व्यवहारी होते म्हणून त्यांनी आम्हाला असे सांगितले की ते हिंदीत बोलण्याचा आग्रह धरणार नाहीत व इंग्रजीतून बोलतील. आणि आम्ही इंग्रजीतून जे बोलू ते ते ऐकून घेतील. तेथे आम्ही जे कार्य केले ते बरेचसे इंग्रजीतून केले कारण कार्य अधिक महत्त्वाचे आहे असे त्याना वाटत होते व म्हणून त्यानी इंग्रजीचा उपयोग केला. अखिल भारतीय कामकाजासाठी हिंदीचा उपयोग करण्याची कल्पना त्यानी सोडून दिली असा याचा अर्थ होत नाही. तेथूनही त्यांनी त्यांच्या मुलाला व स्वामी सत्यदेव याना हिंदीचा प्रचार करण्यासाठी मद्रासला पाठविले व एका हिंदीभाषी व्यक्तीने नव्हे तर महात्मा गांधी व त्याचे चिरंजीव यांनी तेथे हिन्दी प्रचारसभेचा पाया घातला.

म्हणून हिंदीभाषी लोक आपल्यावर हिंदी लादत आहेत असे तुम्हाला वाटायचे काही कारण नाही. आपन महात्मा गांधीइतकेच व्यवहारी आहोत असे मला वाटते. व कार्य अधिक महत्त्वाचे असल्यामुळे त्यांनी जसे इंग्रजीत कामकाज

करण्याचे कबूल केले त्याचप्रमाणे आपणही आपले कामकाज सध्या इंग्रजीतून चालवीत आहोत. व जोपर्यन्त तुमची इच्छा असेल तोपर्यन्त इंग्रजीचा उपयोग चालू राहील असे आता अधिकृतपणे मागमात आले आहे. परंतु मी एक मुद्दा तुमच्या समोर मांडू का? आम्ही तुमच्या भावनांची कदर करावी अशी तुमची अपेक्षा आहे. व आम्ही त्यांची कदर करतो. कोणतीही गोष्ट, एखादी भारतीय भाषा सुद्धा तुमच्यावर लादण्याची आमची इच्छा नाही. म्हणून कृपा करून आमच्यावर एखादी परकीय भाषा लादण्याची इच्छा तुम्ही सुद्धा बाळगू नये. आम्ही इतरांच्याही भावनांची दखल घेत आहोत व हिंदी तुमच्यावर न लादण्याचा आमचा निर्धार आहे. तुम्हीही ताठरपणा सोडाल व आमच्यावर इंग्रजी लादणार नाही असी मला आशा वाटते.

शिक्षणाचा विचार करायचा म्हणजे या भागात हिंदीचाही प्रसार झपाट्याने होतो आहे, असे मला वाटते या भागात इंग्रजीपेक्षा हिंदी शिकलेल्या लोकांची संख्या जास्त असावी. हिंदी प्रचाराचा लाभ निदान 70 लाख स्त्रीपुरुषांना झाला आहे. 15 लाख लोकांनी हिंदीच्या परीक्षा दिल्या आहेत इंग्रजीच्या परीक्षा किती लोकांनी दिल्या आहेत हे मला माहीत नाही. तुमच्यापैकी किती जणांना इंग्रजी समजते व किती जणांना हिंदी समजते असा प्रश्न विचारून मला तुम्हाला अडचणीत टाकायचे नाही.

उत्तरेकडील लोकांनीसुद्धा या बाबतीतली आपली जबाबदारी ओळखावी अशी माझी इच्छा आहे. हिंदीचा प्रश्न त्यांनी दक्षिण भारतीय लोकांवर सोपविला असता तर आतापर्यन्त आपण पुष्कळ जास्त प्रगती केली असती असे मला वाटते. ज्या प्रकारे अभ्यासाचा विषय म्हणून हिंदी स्वीकारण्यात आली आहे त्याचप्रमाणे इतर कामासाठीही तुम्ही तिचा स्वीकार कराल अशी आशा मला वाटते. दक्षिण भारतातील लोकांशी विचारविनिमय न करता व त्यांची संमती न घेता, आपल्या मर्जीप्रमाणे आपण वाटेल ते करू शकत नाही याची उत्तर भारतीयांनी जाणीव बाळगावी अशी माझी इच्छा आहे काहीही झाले तरी अल्पसंख्य लोकांच्या इच्छेचा आदर केलाच पाहिजे हे घटनेतील मूलभूत तत्त्वच आहे. आम्हाला हिंदीचा किंवा अन्य कोणत्या भारतीय भाषेचा अभ्यास व्हावा असे जे वाटते ते फक्त प्रशासकीय कार्यासाठी नव्हे देशाच्या निरनिराळ्या भागांनी परस्परांचा आजच्यापेक्षा अधिक चांगल्या रीतीने परिचय करून घेणे आवश्यक आहे व लोकांच्या अंतःकरणापर्यन्त पोचण्यासाठी त्यांच्या भाषेचा परिचय असायला पाहिजे मी हिंदी बोलणारा आहे. परंतु कलकत्त्यामध्ये माझे शिक्षण घेण्याचे भाग्य मला लाभले. त्या वेळी मी थोडेसे बंगाली शिकलो काही वर्षापूर्वी पदवीदान प्रसंगी भाषण करण्याचे कलकत्त्याला येण्याचे मला निमंत्रण मिळाले तेव्हा मी माझ्या मोडक्या तोडक्या बंगालीत बोललो मी जे काही बोललो त्यात मोठे बहुमोल विचार होते असे काही मला वाटत नाही परंतु त्याचा एक फायदा झाला—ते विचार बंगाली लोकांच्या अंतःकरणापर्यन्त जाऊन पोचले.

उत्तरेकडील लोकांनी दक्षिणेतील भाषाचा अभ्यास करावा अशी माझी इच्छा आहे. अनेक भाषा शिकणे प्रत्येकाला शक्य नाही. परंतु एका भाषेतून दुसऱ्या भाषेत अनुवाद करणे शक्य आहे व लोक भाषा शिकले तरच ही गोष्ट शक्य आहे. यापेक्षाही अधिक महत्त्वाचे म्हणजे लोकांनी देशभर प्रवास केला पाहिजे व प्रवास करताना त्यांनी इंग्रजी बोलता कामा नये. जर तुम्हाला हिंदीत बोलताच येत नसेल तर तुम्ही जेव्हा आमच्याकडे याल तेव्हा आमच्याशी तुमच्या मातृभाषेतून बोला व तुमच्या भाषेचा अनुवाद करून तुमचे विचार आमच्या सामान्य लोकांना समजावून देण्याची काळजी आम्ही घेतली पाहिजे.

मी हिंदीत बोललो असतो तर त्याचा तामीळ भाषेत अनुवाद करणारे बरेच जण मला तुमच्यात आढळले असते तरी सुद्धा मी हिंदीत बोललो नाही. याचे कारण मला तुमच्याविषयी आदर वाटतो. मी जर हिंदीत भाषण केले तर तुम्ही मला साम्राज्यवादी म्हणाल अशी भीती मला खरोखरच वाटली. आयुष्यभर आपण साम्राज्यवादाशी झगडलो माझ्या आयुष्याच्या सध्याकाळी मी कोणत्याही प्रकारची साम्राज्यशाही वृत्ती बाळगीन अशी कल्पना कृपा करून तुम्ही करून घेऊ नका.

ज्या विषयावर मला बोलायचे होते त्यापासून मी दुसरीकडे वहावत गेलो आहे असे मला वाटते. खरा मुद्दा हा आहे की आपल्याला देशात ऐक्य हवे आहे. प्रांतीयता, जातीयता, भाषावाद या सर्व गोष्टी देशासमोर गौण मानल्या पाहिजेत व माझी खात्री आहे की स्वदेशाभिमानामुळे कालांतराने हिंदीचा स्वीकार करणे तुम्हाला भाग पडेल. माझ्या उत्तर भारतीय देशबांधवांना मी असे सांगू शकतो की तुम्ही जेव्हा हिंदीचा उपयोग करायला सुरुवात कराल, तेव्हा तुम्ही त्यांच्यापुढे जाल. तुम्ही इग्रजीच्या बाबतीत इग्रजाना मागे टाकले तसेच हिंदीच्या बाबतीत तुम्ही हिंदी बोलणाऱ्यांना मागे टाकाल अशी माझी खात्री आहे म्हणून केंद्र सरकारच्या नोकरीत भरती होऊ इच्छिणाऱ्या कोणत्याही व्यक्तीला भीती वाटायचे काही कारण नाही. परतु अशी भीती जोपर्यन्त वाटेल, मग ती कितीही निराधार असो, तोपर्यन्त आपल्याला तिची दखल घ्यायलाच पाहिजे.

## फुटीर प्रवृत्तींना आळा घाला

विकासकार्याचा वेग वाढत असल्याचे पाहून आपणा सर्वांना आनंद होतो. या कार्यामुळे भारताचे, विशेषत ग्रामीण भागाचे रंगरूप झपाट्याने बदलत आहे. आपले औद्योगिक व शेतकी उत्पादन दरवर्षी वाढत असून पचवार्षिक योजनांप्रमाणे ठरविलेली उद्दिष्टे आपण साध्य करीत आहोत. आपल्या योजनांची उद्दिष्टे क्रमाक्रमाने आपण साध्य करीत जाऊ अशी आशा बाळगायला काही हरकत नाही.

---

मद्रास येथे 15 ऑगस्ट 1960 रोजी (स्वातंत्र्यदिनी) राष्ट्राला उद्देशून केलेले भाषण

आपल्या कार्याच्या या अंगाविषयी, मग ते कितीही संतोषजनक असो, माझे विचार व्यक्त करायचा माझा विचार नाही, तर भारतातील काही अनिष्ट प्रवृत्ती-विषयी चार शब्द सांगण्याचे अप्रिय काम करण्याचा माझा विचार आहे. या अनिष्ट प्रवृत्तींमुळे, अनेक देशाभिमानी भारतीयांच्या मनांत, आपल्या देशाच्या भावी समृद्धीविषयी, मोठ्याविषयी शंका निर्माण झाली आहे. या प्रवृत्तींना आपण पायबंद घातला नाही तर औद्योगिक व इतर क्षेत्रांत आपण जी काही प्रगती केली आहे ती व्यर्थ ठरेल. म्हणून अनेक शतकांच्या गुलामगिरीनंतर आपण प्राप्त केलेल्या स्वातंत्र्याचे व आपल्या समाजाची व अर्थव्यवस्थेची पुनर्रचना करण्यासाठी मिळालेल्या संधीचे रक्षण करण्यासाठी या फुटीर प्रवृत्तींना आळा घालणे प्रत्येक देशभक्ताचे कर्तव्य आहे.

सद्भाव, समजसपणा व सहिष्णुता यांच्या साहाय्याने संघर्षाच्या सर्व कारणांचे उच्चाटन करून देशातील ऐक्यभाव दृढ करण्याच्या आवश्यकतेवर मला आज भर द्यावासा वाटतो. अलिकडेच काही दु:खद घटना घडल्याचे आपण पाहिले. त्यांचा केवळ उल्लेख करतानाही मला दु:ख होते. त्यांची पार्श्वभूमी किंवा त्या घडण्याचे तात्कालिक कारण कोणतेही असो, वैमनस्य, द्वेषभाव, इत्यादि अनिष्ट प्रवृत्तींनी आपल्या राष्ट्रीय भावनेवर व विवेकशीलतेवर मात करता कामा नये. अशा घटनांमुळे वेगळेपणाची व कडवटपणाची भावना निर्माण होऊन देशाच्या ऐक्याला धोका निर्माण होतो. एखादा प्रश्न मग तो भाषेचा असो, धर्माचा असो किंवा अन्य कोणताही असो, तो सोडविण्यासाठी हिंसेचा अवलंब करणे असमर्थनीय आहे. हिंसेचा अवलंब केल्याने काही फायदा होणार नाही हेही आपण लक्षात ठेवले पाहिजे. आपण सर्वांनी व्यापक दृष्टिकोन ठेवला पाहिजे व तारतम्य-भाव सोडता कामा नये अशी माझी विनंती आहे. परस्पराविषयी सहिष्णुता व योग्य दृष्टिकोण या गोष्टी असल्या तर देशाच्या काही भागात ज्या दुर्दैवी घटना घडल्या तशा घटना कधीही घडणार नाहीत. आज निर्माण झालेले तंग वातावरण व सरहद्दींवर निर्माण झालेला धोका यांच्यामुळे आपले ऐक्य दृढ करण्याची आपली इच्छा अधिक तीव्र व्हायला हवी.

स्वातंत्र्यदिनी अशा सुरात सामान्यपणे बोलत नाहीत हे मला माहीत आहे. मी जे विचार मांडले आहेत ते, परिस्थिती स्थिरस्थावर व्हावी व मी ज्या अनिष्ट प्रवृत्तींचा उल्लेख केला आहे त्यांना वेळीच पायबंद घालण्यात यावा या आपल्या उत्कट इच्छेचे द्योतक समजण्यात यावे.

-----